


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







भारत सरकारचे १९६५ चे श्रेष्ठता प्रमाणपत्र मिळविणारे एकमेव मराठी मासिक

आंतरराष्ट्रीय
विनोद विशेषांक

वर्षारंभ
मार्च १९६६
वर्ष २२ वें मूल्य १। रु.



# दीपावली

साहित्य-कला-सङ्गम

## श्रेयनामावलि–

* **खास ( आणि खुसखुशीत ) पत्र–ठणठणपाळ** ( द् ओरिजिनल ) यांचे
* **तुफान विनोदी एकांकिका**–आम्ही सौजन्यात आहोत ! – **श्री. वसंत सबनीस**
* **अंदमान ते आनंदमान**–एक कायाकल्प ( प्रवास ) कथा–**श्री. माधव राजवाडे**
* **आणि आंतरराष्ट्रीय विनोदाची ( केवळ ) झलक** (याने कथा)–फ्रेंच चित्रपटातील तीन पलंग कथा ( **रमेश मंत्री** ) ● पंपू.........लॉजिक व टाईट पॅण्ट ( **सदानंद रेगे** ) ● एकेकाची तऱ्हा ( **शां. शं. रेगे** ) ● लॉंग यू आणि (पुस्तकातील झाली तरी) एक बाई– ( **वसंत फेणे** ) ● असंगाशी संग देवाशी गांठ ( **श्रीराम कामत** ) ● हिझा कुरीज् ( **प्र. श्री. नेरूरकर** ) ● माझी तपासणी होते ( **प्रभाकर अत्रे** ) ● असा चुकतो रस्ता ( **रॉक कार्व्हालो** ) ● नाक ! ( **सौ. लीला देशमुख** )

**याशिवाय**

सन्मानपुष्पे, विनोदी चुटके ( ह. शि. खरात ) देशी–विदेशी व्यंगचित्रे व खरेखुरे विनोद (पानोपानी हास्याचा स्फोट घडविणारे).

**दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

Gram : Dalalart
टे. नं. ३५७७६५

संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १[illegible] अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57
DIPAVALI : Dalal Art Studio, 40–42, Kennedy Bridge, Bombay – 4.



अनुक्रमणिका

# दीपावली

## दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मंबई ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारस सूचना** : दीपावली व सर्व खास अंकसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टु डओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडियो, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

# पाथेय

'दीपावली'चा हा बावीसावा वाढदिवस! अर्थातच आनंदाचा, अभिमानाचा! गौरवाचा, आत्मचिंतन–परीक्षणाचा! आत्मपरीक्षण यासाठी कीं, कलेच्या ह्या साधनेचा 'अंतिमशब्द' अजूनहि गवसलेला नाही. त्या शब्दाच्या जवळ जवळ नेणारेच हे वाढदिवस–आणि म्हणून मनांत उदंड आशा आहे. उरीं उत्साह आहे. दृष्टि समोर कांहीं अंधुक आकृति आहेत. त्यांतल्या सौंदर्याचे आवाहन मनाला सतत बोलावते आहे. ते संशोधनच अखेर जीवनाच्या अंतिम सत्याकडे घेऊन जाणारे असल्यानेच 'दीपावली' कला–साहित्य आणि संस्कृतीची निशाणे हाती घेऊन ह्या प्रवासाला निघाली आहे. निशाणे खांद्यावर आहेत. पावले ताठ पडताहेत. रस्ता स्वच्छ दिसतो आहे. कांहीं दिव्य भास होताहेत. मागे वळून पाहणे सुखावह होते आहे. कमाई केली आहे ती निराशात्मक नसल्यानेही मनाला बरे वाटते आहे. जीवनावर, जीवनांतल्या मांगल्यावर आणि मूल्यांवर, सौंदर्यावर आणि विविधतेत दडलेल्या अंगभूत एकत्वावर, माणसावर आणि माणसांतल्या देवत्त्वावर आमची श्रद्धा होती आणि बावीस वर्षांच्या ह्या साधनेने व प्रवासाने ती वाढली आहे. संकटे येतात. कांही काळ माणूस मोडला आहे. उमेदींची माती झाली आहे असेही वाटून जाते. पण पुन्हां पुन्हां माणसे उभी राहतात. शून्यातून सोने उभे करतात–जळितातून इमले उभे करतात आणि जळून गेलेल्या इतिहासाला नवे रूप, नवे वळण देतात. ह्या माणसांनी केलेल्या कला–साहित्य–संस्कृतीच्या उपासनेचे पाथेय घेऊन 'दीपावली'ने आपला प्रवास सुरू केला होता. आज आम्ही आणखी एक मैलाचा दगड ओलांडीत आहोत. आनंद आणि आशा उरीं बाळगून!!

आनंद आणि आशेपोटी हास्य फुलते. मनांत विनोद साकारतो. गात्रे हंसूं लागतात. वाढदिवसाचा हा आनंद साजरा करण्यासाठीच 'दीपावली' प्रतिवर्षी वर्षारंभ अंक 'विनोद विशेषांक' म्हणून सादर करते. यंदा एक नवा प्रयत्न आम्ही करीत आहोत. जपानी, रशियन, फ्रेंच, अमेरिकन, चिनी, आदि वैश्विक भाषांतील कांही विनोदी गोष्टीचे अनुवाद आम्ही सादर करीत आहोत. हा आंतरराष्ट्रीय विनोद मनाला गुदगुल्या करून जाईल. कांहीं नवे नमुने–नवी माणसे भेटवील खास! त्यांच्याशी बोलतांना आपला चेहरा हंसरा झाला. सांसारिक खंतींच्या आंठ्या पळून गेल्या तरी 'दीपावली' चा वाढ दिवस थाटांत साजरा झाला असे आम्ही मानूं!

आतां आम्ही जरा मागे वळून पाहूं काय? कलेच्या साधनेत ते आवश्यक आहे म्हणूनच केवळ! आम्ही तसे काय केले? "उत्तर दिग्विजय" ही प्रवासवर्णनात्मक पु. भा. भावे लिखित लेखमाला गेल्या वर्षीच्या वर्षारंभ अंकात संपली. आणि "देवाला डोळे असतात" ही एक आगळी 'युद्ध-कथा' प्र. श्री. नेरुरकरांनी वाचकांना सादर केली. 'आम्हीं असे लिहितो' ह्या गतवर्षी सुरू केलेल्या प्रभाकर अत्रे यांच्या मुलाखत मालेत यंदा कुसुमाग्रज, विभावरी शिरुरकर प्रा. वसंत कानेटकर, श्री. ना. पेंडसे ह्या मातबरांच्या मुलाखती सादर झाल्या. डॉ. दत्ताराम तेलंगांच्या एव्हरेस्ट वारीच्या निमित्ताने 'एव्हरेस्ट विजय' अंक आम्ही सादर केला. त्या अंकाने दीपावलीला गौरव–अभिनंदनाचा 'एव्हरेस्ट' दिसला. दिलीप पु. चित्रे यांच्या 'शिबा राणीच्या शोधांत' ह्या लेखमालेने वाचकात (व साहित्यिकांतही) 'सेन्सेशन' उत्पन्न केले. कवि वा. रा. कान्त नव्यानेच दीपावली कुटुंबात आले. आणि सुंदर कविता, निबंधांनी त्यांनी 'साथ' केली. पु. भा. भावे. अरविंद गोखले, पु. ल. देशपांडे, जयवंत दळवी, रमेश मंत्री, ह्या दीपावलीच्या मानकऱ्यांबरोबरच कांही नवी मंडळीही 'साथी'ला बसली. दिवाळी अंकाचे रसिकांनी जे अमाप कौतुक केले–अजूनहि करताहेत–त्याने तर आम्ही अक्षरशः भारावून गेलो आहोत. हे कौतुक हेच तर आमचे पाथेय आहे. त्या शब्दातून व्यक्त होणाऱ्या भावनेमुळेच आमच्या शब्दांना शक्ति येते. गति येते. कंठातून 'सुस्वर' निघतात. अनुभव 'चेतनामय' होऊन अभिव्यक्त होतात. भोंवतीच्या रंगातून फक्त 'सौंदर्य'च ठिबकते. रेषा "बोलक्या" होतात. भाव "अत्तरांचे सडे" शिंपू लागतात. शब्दांना सुरांचे लेणे लाभते. नादांचे नुपुर छुनछुन करूं लागतात. आणि चिंतनाला 'चैतन्याचा' ध्यास जडतो. त्या चैतन्याच्या ध्यासातूनच ही 'साधना' दीपावली करीत आहे. ह्या साधनेचे उद्‌गाते साथी–रसिक वाचकहो, आपण आहांत. आप[illegible] केवळ आहांत.

–संपादक






# संपादक 'दीपावली'

## यांस

## स. न. वि. वि.



**आपण** आपल्या मासिकाचा 'आंतरराष्ट्रीय विनोद विशेषांक' काढीत आहात हे कळले. त्या अंकासाठी आपण आमचा आशीर्वाद मागितला आहे. या बाबतीत नजरचुकीने काही तरी गफलत झाली असावी असा संशय आला. म्हणून पत्रातल्या आशीर्वादाची मागणी करणाऱ्या दोन ओळी कापून आम्ही त्या पद्मश्री पु. ल. देशपांडे यांचेकडे पाठविल्या आहेत. तेव्हा आशीर्वाद तिकडून मिळेल. आम्ही स्वतः दुसऱ्याच्या क्षेत्रात सहसा पडत नाही. असो.

तथापि आपण आंतरराष्ट्रीय विनोद विशेषांक काढीत आहात ही गोष्ट चांगली आहे. अलिकडे बहुतेक मासिके वर्षातून आठ दहा वेळा विशेषांक काढतात. (अनेकदा अशा अंकांची किंमतच जरा विशेष असते हे विशेष!) सांप्रतच्या महर्गतेच्या काळात एक रुपयावाला साधा अंक परवडणे कठीणच! त्यामुळे विशेषांकाची अपरिहार्यता पटावी. तथापि अशा विशेषांकात विनोदी विशेषांक अधिक असतात. त्यावरून विनोदाला बाहेर गिऱ्हाईक बऱ्यापैकी असावे असे दिसते. तथापि 'चालू' (म्हणजे मराठी) विनोद विशेषांकाऐवजी आपण 'आंतरराष्ट्रीय' विनोद विशेषांक काढीत आहात ही विशेष समाधानाची गोष्ट! कारण एक तर असला विनोद हुकमी सांपडतो. कारण तो इंग्रजी विनोदी पुस्तकातूनच घ्यायचा असतो. कोणत्याहि ग्रंथालयात जाऊन विनोदी साहित्याच्या कपाटात हात घातला, की विनोदी पुस्तक हाती लागते. हे इंग्रजी पुस्तक वाचून ते (मराठी पुस्तकाप्रमाणे) खरोखरच विनोदी आहे की नाही हेहि ठरवावे लागत नाही. तसेच त्यातला विनोद चांगला आहे की, नाही हेहि पाहावे लागत नाही. कारण इंग्रजी विनोद हा मराठी विनोदापेक्षा श्रेष्ठ असतोच, असलाच पाहिजे असे काही शहाणे लोक आपल्या मनावर सतत ठसवीत असल्यामुळे त्या विनोदाला वाईट म्हणण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. तसेच, विलायतची मेल आल्याशिवाय मराठी साहित्यिकाचे पान हालत (किंवा भरत) नाही असे सतत म्हणण्याची काही अ-साहित्यिक लोकांची एक जुनी खोड आहे. त्यांनाहि अशा विशेषांकामुळे बरे वाटेल. आपण म्हणत होतो तेच खरे असे म्हणण्याची त्यांना एक संधि मिळेल! आणखीहि एक फायदा असा की, अशा आंतरराष्ट्रीय विशेषांकात, मूळ इंग्रजी विनोद इंग्रजीतून मराठीत भाषान्तरीत करण्याचा प्रश्न असल्यामुळे ज्यांना मराठीत स्वतंत्र विनोदी लिहिता येत नाही अशा लेखकांनाहि फक्त भाषान्तर करून अशा विशेषांकात सहभागी होता येईल आणि विनोदाशी (तेहि आंतरराष्ट्रीय) नाते सांगता येईल.

आपले इंग्रजीचे प्राध्यापक सदानंद रेगे (कवि, कथाकार वगैरे) एक वर्ष नॉर्वेत घालवून आले. (ते आता आपले रेगे हे आडनाव बदलून नार्वेकर असे करणार आहेत असे ऐकतो!) इंग्रजी भाषेशिवाय अन्य परकीय भाषेचे (प्रगाढ) ज्ञान असलेले ते महाराष्ट्रातले एकटेच लेखक! (असे आमचेच नव्हे तर त्यांचेहि मत आहे) इब्सेनचे ते मूळ नॉर्वेजियनमधून मराठीत भाषांतर करीत आहेत. (असे आम्हास 'अभिरुचि' मासिकातून कळले!) त्यामुळे या विशेषांकासाठी ते मूळ नॉर्वेजियन भाषेतला विनोद पुरवतील अशी आशा आहे. त्यात त्यांचे भाग्य असे की, 'भाषांतर तेवढेसे जमलेले नाही' असा नेहमीप्रमाणे (भाषांतर वाचण्याआधी घाईने) मारावयाचा शेरा आम्हास मारता येणार नाही. आम्ही नेहमीच्या सवयीने आणि आगाऊपणाने तसा शेरा मारला आणि 'नॉर्वेजियनचे तुम्हास गम्य तरी कळते काय?' असा उलटा प्रश्न नार्वेकर रेगेनी आम्हास विचारला तर आमची काय बरे 'खानदानकी इज्जत' राहिली?

अर्थात आम्हाला नॉर्वेजियन समजत नाही याचे दुःख नाही. या प्रकरणी रेगे सोकावतील ही भीति आहे. कारण येथे कोणालाच नॉर्वेजियन भाषा येत नसल्यामुळे रेगे नॉर्वेजियन नांवावर खूपसे आपलेच खपवतील अशी शक्यता आहे. पुनः आमच्यासारख्याना ते श्रेष्ठ साहित्य म्हणावे लागणार. कारण ते मूळात नार्वेजियन. म्हणजेच आपल्याला न समजणारे (समजत नाही ते श्रेष्ठ हे ओघानेच आले!) काही वर्षे आम्ही ते श्रेष्ठ म्हटले की, मग हे नार्वेकर रेगे एके दिवशी अनंत काणेकरांप्रमाणे जाहीर करतील, "लोक हो! मी श्रेष्ठ आहे. मी जे नार्वेजियन लेखकांच्या नांवावर आजवर खपवले ते त्यांचे नसून








माझेच होते. मी महाराष्ट्राचा इब्सेन आहे!" म्हणजे पुन: आमची पंचाईत! ते मूळात नार्वेजियनच आहे हे सुद्धा आम्हास सिद्ध करता येणार नाही. त्यामुळे रेगे हे इब्सेन आहेत हे नाक मुठीत धरून मान्य केल्याशिवाय गत्यंतरच उरणार नाही. (करू मान्य! मान्य न क त.हि काही लेखक स्वत:ला तसे काही वाही समजतातच. मग मान्यताच कां देऊ नये?) असो.

तर सांगण्याचा मुद्दा इतकाच की, आन्तरराष्ट्रीय विनोदाचे भाषांतर केल्यामुळे काही गंभीर साहित्यिकांना विनोदाच्या जवळ येण्याची संधि मिळेल. काहींना परदेशी विनोद आणि देशी विनोद यांची तुलना करता येईल. (आणि नेहमीप्रमाणे परदेशी तेच श्रेष्ठ असे म्हणता येईल!) लेखकांच्या वाढत्या मोबदल्याचाहि प्रश्न सुटेल. कारण येथे मूळ लेखकाला मोबदला द्यायला नको. पण त्याहिपेक्षा या आंतरराष्ट्रीय विनोद विशेषांकाचा जो मोठा फायदा होईल तो हा की, यामुळे विनोदी साहित्याला पुन: एकदा मानाचे पान मिळेल. (अर्थात हे पान नेपा मिलचे पिवळे नसेल तर बरे!)

सांप्रत विनोदाला पुन: एकदा वाईट दिवस येतील की, काय अशी भीति वाटत आहे. रामदास स्वामींच्या काळात विनोद म्हणजे टवाळखोरी असे मानले जाई. दाढी-मिशी आणि विनोद यात काही तरी मूलत: वाकडे असावे असा आमचा कयास आहे. दाढी-मिशीवाल्यांना सहसा विनोद आवडत नाही. ते हंसतहि नाहीत. चुकून कधी हंसले तरी ते दाढी-मिशीतून दिसतहि नाही. या आमच्या मतास पुढे पुरावाहि मिळतो. पुढे पुढे दाढी-मिशीवर संक्रांत येत गेली तसतशी विनोदाची वाढ होत गेली. कोल्हटकर, गडकरी यांनी दाढी ठेवली नाही फक्त मिशांवरच त्यांनी भागवले. चिं. वि. जोशी यांनी काही वर्षे मिशा ठेवल्या. पण पुढे काढल्या. आचार्य अत्रे, पु. ल. देशपांडे वगैरेनी तर मिशा काढूनच विनोदाला हात घातला. आता महाराष्ट्रात दाढी तर सोडाच, पण मिशी सुद्धा ठेवणारा विनोदी लेखक सांपडणार नाही. (वसंत सबनीसांनी तर डोक्यावर सुद्धां केस ठेवलेले नाहीत) हा नियम विरोधी उदाहरणाने सिद्ध करायचा असला तर असे म्हणता येईल की, आपण मुळीच विनोदी लेखक नाही हे जाहीर सिद्ध करण्यासाठी गो. नी. दांडेकर दाढी-मिशी ठेवीत असावेत. (गंभीर साहित्यावर मिळणारा मोबदला फुकटचा तेलात खर्च!) याच दृष्टिकोनातून विचार करता सरदारजीवर 'जोक्स' खपविण्याची आमची रीत इष्ट नाही असे आमचे आंतरभारतीय मत आहे. असो!


FRANCE—Herve (France Dimanche)

आणि तरीहि दाढी किंवा मिशी न ठेवणारे गंगाधर गाडगीळ परवा एकदम विनोदावर उलटले याचे आश्चर्य वाटते. मुंबईत झालेल्या एका परिसंवादात त्यांनी विनोदी साहित्य हे खऱ्या अर्थाने साहित्यच नव्हे असे सांगितले. त्यामुळे पद्मश्री पु. ल. देशपांडे यांनी वैतागून 'विनोदी लेखन हे साहित्य?—हॅट्–हडत्–किंवा हुडुत्!' असा एक हुडुत् हुडुत् करणारा लेख लिहिला. ('विनोद' दिवाळी १९६५) आणि आपण इतकी वर्षे विनोदी लिहिले, लोकांना हंसविले आणि शेवटी हे काय झाले अशा प्रकारची खंत त्यांनी व्यक्त केली.

एका अर्थाने पाहिले तर गाडगीळांना विनोदाबद्दल असे वाटणे स्वाभाविक आहे. कारण हंसण्याची क्रिया ही तशी खालच्या पातळीचीच मानली जाते. आपण एखाद्या इसमाला हंसतो, तेव्हा तो इसम हलक्या दर्जाचा असतो. दर्जा जेवढा उच्च तेवढ्या भुवया उंच होत जातात. पण हंसताना भुवयांची हालचाल होत नाही. तेव्हा हंसणे हे खालच्या प्रतीचे असते हे ओघानेच आले. इथेहि दर्जेदार (म्हणजे गंभीर) साहित्याचा आणि केसाचा संबंध स्पष्ट व्हावा. दर्जेदार साहित्याला उच्चभ्रू (हाय ब्रो) म्हटले जाते ते लक्षात ठेवण्यासारखे आहे. विनोदी साहित्याने दाढीमिशीचा तर सोडाच, पण भुवईचा सुद्धा केस हालत नाही. त्यामुळे विनोदाला दर्जा नाही असे प्रा. गाडगीळांना वाटणे स्वाभाविक आहे. (खुद्द गाडगीळांनी थोडे विनोदी लेखन केले आहे. पण ते 'हेअर रेझींग' आहे असे ते कदाचित सिद्ध करतील आणि त्यामुळे ते दर्जेदारहि ठरेल!)

परवा (एक स्वतंत्र विनोदी लेख लिहिण्याच्या निमित्ताने) आम्ही काही इंग्रजी विनोदी पुस्तके चाळत होतो. त्यावेळी एका पुस्तकात आम्हाला एक गंमतीदार लेख आढळला. लेखाचे मुळी नांवच होते WHY WE LAUGH — or DO WE? या लेखकाचे मत प्रा. गंगाधर गाडगीळांच्या मता-

सारखेच वाटले. या लेखकाच्या मते हंसण्याची क्रियाच मुळी शिकण्यासारखी आहे. तो म्हणतो, शिकणे किंवा शिक देणे ही जशी स्नायूंची एक यांत्रिक हाल-चाल असते तशीच हंसण्याची क्रिया असते. खरे म्हणजे प्रत्यक्षात आपल्याला शिकायचेच असते परंतु नेहमीच उठल्या बसल्या शिकत रहाणे बरे नाही म्हणून आपण अधून मधून हंसतो एवढेच ! कधी कधी हंसणे आणि शिकणे या दोन क्रियांचे योग्य महत्त्व न कळल्यामुळे आपण. हंसता हंसता शिकतो किंवा शिकता शिकता हंसतो. त्यामुळे किमान आवाज मोठा होतो. (विनोदाचा गाजावाजा अधिक होतो तो या आवाजामुळेच असावा अर्थातच हे आमचे मत !)

हाच लेखक पुढे म्हणतो,– (आता मात्र इंग्रजी उतारा देतो. त्यामुळे आमचा व्यासंगहि स्पष्ट होईल. तसेच इंग्रजाच्या नांवावर ही आमची थापेबाजी आहे असा कुणास संशय यायला नको. आता हा उताराहि आमचाच आहे असे काहींना वाटले तर आम्हाला आनंद होईल हे खरे. पण एवढे चांगले इंग्रजी आम्हास लिहितां येईल असे कोणास वाटेल अशी शक्यताच नाही. असो. तर तो उताराच आता वाचा–)

"The old phrase 'That is nothing to sneeze at' proves my point. What is obviously meant is 'That is nothing to laugh at'. The wonder is that nobody ever thought of this explanation of laughter before, with the evidence staring him in the face like that.**

We sneeze because we are thwarted, discouraged or devil-may-care. Failing a sneeze, we laugh.

** Schwanzleben, in his work 'Humour After Death', hits on this point indirectly when he says, "All laughter is a muscular rigidity spasmodically relieved by involuntary twitching. It can be induced by the application of electricity as well as by so-called 'joke'."

म्हणजे आता गंमत पाहा. या सिद्धांता-प्रमाणे, एरव्ही आवळून धरलेले तोंडाचे स्नायु विशिष्ट झटक्याने तात्पुरते सुटले की, हास्य निर्माण होते. असे हास्य एखादी 'जोक' मारून जसे निर्माण करता येते तसेच विजेचा झटका देऊनहि निर्माण करता येते. यामुळे उद्या सगळे विलेक्ट्रिक फिटर्स विनोदी लेखकांच्या रांगेत येऊन बसतील. आम्हास त्याचेहि दुःख वाटत नाही. पण उद्या आचार्य अत्रे, पद्मश्री पु. ल. देशपांडे यासारखे विनोदी लेखक लोकांना हंसविण्यासाठी एका हातात पक्कड आणि दुसऱ्या हातात विजेच्या तारांचे दोन तुकडे घेऊन फिरू लागले म्हणजे मग विनोदाचे काय राहिले ? त्यांना पाहून सुद्धा लोक हंस-तील हे खरे ! पण ते हंसणे योग्य होईल काय ? असो.

एकूण, स्वदेशी आणि परदेशी विनोदा-वर असे संकट आलेले असताना आपण आंतरराष्ट्रीय विनोद विशेषांक काढून विनोदाचे ढळणारे स्थान पुनः मिळवून देण्याचे महान् कार्य करीत आहात असे आमचे प्रांजळ मत आहे आणि त्याबद्दल आपण अभिनंदनास पात्र आहांत त्याःहि मराठी विनोदावरील संकट निवारण्यासाठी आपण आंतरराष्ट्रीय विनोद विशेषांक काढीत आहांत. यात आपले चातुर्यच दिसून येते. कारण अलिकडे कोणतेहि देशी संकट शेवटी आंतर-राष्ट्रीय मदतीशिवाय टळत नाही हे आपण बरोबर हेरले आहे.

जाता जाता सूचना एवढीच करावीशी वाटते की, आपल्या या विशेषांकाची एक एक प्रत आपण प्रा. गंगाधर गाडगीळ आणि पद्मश्री पु. ल. देशपांडे यांना 'भेट' म्हणून पाठवावी. म्हणजे कदाचित् प्रा. गाडगीळ विनोदाबद्दल आपला दृष्टिकोन बदलतील आणि पद्मश्री पु. ल. देशपांडे यांना पुनः जोमाने लिहावेसे वाटेल. असो. कळावे. लोभ असावा. आपला नम्र,

C/o ललित मासिक, **'ठणठणपाळ'**





अनुक्रमणिका

[एक सौजन्यस्फोटक एकांकिका]



# आम्ही सौजन्यात आहोत !

— वसंत सबनीस

[नाना वेरके यांच्या बिऱ्हाडातील बैठकीची खोली. समोर बाहेरून येण्याचे मुख्य दार आहे. दोन्ही बाजूला आणखी काही खोल्या वा स्वयंपाकघर आहे. हे बिऱ्हाड वरच्या मजल्यावर आहे. सर्वसामान्य मध्यमवर्गीयांच्या बिऱ्हाडातील बैठकीच्या खोलीची जेवढी सजावट असते तेवढीच या खोलीची आहे. मात्र एका टेबला-खाली तवला व डग्गा आहे, बाजाची पेटीही आहे. पडदा उघडतो तेव्हा मुख्य दार बंद आहे. नाना वेरके सकाळचे वर्तमानपत्र घेऊन वाचण्यात रमले आहेत. अर्थात वेळ सकाळची आहे. ते वाचण्यात दंग असतानाच नानी अत्यंत अदबीने व तोंडावर सारखं हसू ओढीत येतात. नानानी वर्तमानपत्रात डोळे खुपसलेले पाहून एकदम रागावतात पण क्षणात पुन्हा हसऱ्या होतात.]

**नानी :** (कृत्रिम सौजन्याने) ऐकलं कां ? पाणी काढून ठेवलं आहे. थोडा आळस बाजूला ठेवावा आणि उठावं... (नाना वाचनातच दंग) ...इकडनं ऐकायचं झालं का ?

**नाना :** (वर्तमान पत्र बाजूला करून) काही म्हणलात का आम्हाला ?

**नाना :** मग कुणाला म्हणाले ? भिंतीला ?

**नाना :** तसं नव्हे . . तुम्हाला स्वतःशीच बोलायची संवय आहे म्हणून म्हटलं.

**नानी :** असं दुसऱ्याचं सारखं उणं काढणं बरं नव्हे . . . स्नान करून येणं होईल का इकडनं ?

**नाना :** (प्रसन्नपणे हसत) वा ! वा ! बरी वाटते ही भाषा कानाला . . . कधी सवय नसल्यामुळे जरा चुकल्या चुकल्यासारखं वाटतं. . .पण आनंद वाटतो ऐकताना.

**नानी :** मग स्नानाला निघायचं होईल ना ?

**नाना :** होईल बरं होईल. आर्ये, तू किती कष्ट घेतेस माझ्यासाठी ?

**नानी :** नाथ, यात कष्ट कसले ? गीझरमधून पाणी काढताना आपण फार धसमुसळेपणा करता––त्यापायी दोनदा गीझर मोडला ना––म्हणून गीझरच्या संरक्षणासाठी मी आपल्याला पाणी काढून देते...

**नाना :** आर्ये, मोठ्या सौजन्यपूर्ण रीतीनं तू आमचा अवगुण निदर्शनास आणलास याबद्दल मी तुझा ऋणी आहे. तुझ्या ऋणातून मी कसा मुक्त होऊ ?

**नानी :** तावडतोब आणि स्वच्छ आंघोळ करून.

**नाना :** ठीक आहे. हा निघालो मी . . . .

**नानी :** स्नान व्यवस्थित करायचं बरं ? स्नान झाल्यावर कानात साबण ठेवून तसंच बाहेर यायचं नाही.

**नाना :** हा आणखी एक अवगुण निदर्शनास आणलास काय ?








मला वाटतं आता लौकर स्नानास निघावे नाही तर इतरही अनेक अवगुण जगापुढे येतील.

(तेवढ्यांत 'नाना अहो नाना' अशा बाहेरुन हाका ऐकू येतात. हा आवाज सदाशिवचा)

**सदा :** नाना. . . घरात आहे का कुणी ?

**नाना :** अरे थांब. . . थांब . . .

(नाना दार उघडण्यास जातात आणि नानी घरात जातात. दार उघडतात. घरात सदाशिव–तरुण उत्साही) ओऽहो सदाशिव ? या...या. .आत या. सदाशिवराव तुमचे स्वागत असो... (सदाशिव 'आ' वासून नानांकडे बघतच राहतो) अरे असा बघतोस काय ?

**सदा :** नाना. . . माझं स्वागत करताहात ?

**नाना :** होय. . तुझं स्वागत असो.

**सदा :** (इकडे तिकडे पाहून) आणि आज तुमच्या घरात इतकी शांतता ? सर्व ठीक आहे ना ?

**नाना :** म्हणजे ?

**सदा :** आपण घर तर चुकलो नाही ना असं क्षणभर वाटलं. अहो तुमच्या घरात नेहमी आवाज असतो. केव्हाही आलं तरी विश्रामचा तवला किंवा मंदाची पेटी नाहीतर नानींची भांडी किंवा तुमचं रागावणं यानी घर कसं दणाणलेलं असतं. . .

**नाना :** त्या अर्थाने म्हणतोस होय ?

**सदा :** आणि "सद्या आलास का तू ?" या वाक्यानं माझं स्वागत करण्याची या घरची नेहमीची रीत असल्यामुळे तुमचे स्वागत असो असे शब्द कानावर आल्यावरोबर जिन्याची एक पायरी चुकल्यासारखं वाटलं मला. तुमच्या तब्येतीला तर काही झालं नाही ना ?

**नाना :** छे : छे : तब्येत छान आहे. आज कां येणं केलेत आपण ?

**सदा :** (खळखळून हसतो) नाना, इतके सौजन्यशील शब्द तुमच्या तोंडून ऐकायची कानाना सवयच नाही कधी. हे कसं वाटतय सांगू ? ज्वालामुखीतून लाव्हा रसाऐवजी लोणी बाहेर पडावं किंवा वाघानं म्यांव करावं तसं वाटतं आहे.

**नाना :** अरे पण सदाशिव, किती वेळ तिष्ठत उभा राहशील ? स्थानापन्न हो —

**सदा :** स्थानापन्न काय ? नाना आज तुम्ही भांग वगैरे सारखं कांही पेय घेतलं आहे काय ? नाहीतर इतकी प्रौढ भाषा तुमच्या जीभेवर होती ना —

**नाना :** अरे सुसंस्कृतीत आणि संस्कृतात सौजन्य ठळकपणे उठून दिसते. तुझे सर्व कुशल आहे ना ? जन्मग्रामी सर्व क्षेम आहे ना ?

**सदा :** नाना, अजून एकसुद्धां उग्र शब्द वा कणखर शिवी तुमच्या तोंडून बाहेर पडली नाही ही आश्चर्याची गोष्ट आहे. तुम्हाला आज भलतंच काहीतरी झालेले दिसतंय...

**नाना :** भलतं सलतं काहीही झालेलं नाही आणि हे वय आहे का भलतं होण्याचं. झालंच असलं तर थोडं सौजन्य झालं असेल.

**सदा :** सौ[illegible] आणि तुम्हाला ? नाना, औरंगजेबानं गाणं म्हटल्याचा पुरावा कदाचित सांपडेल किंवा पुढारी दुसऱ्याची व्याख्यानं ऐकायला जातील पण तुम्ही सौजन्याच्या जवळपास फिरकाल असं नाही वाटत आपल्याला. . . नानी अहो नाऽनी . . .

**नानी :** (आतून) कोण आहे ?

**सदा :** मी सद्या आहे. . .

**नानी :** (येतात) कोण सदाशिवराव भाऊ ?

**सदा :** सदाशिवराव भाऊ ! नानी मला एकदम पेशवेपदी नेऊन बसवलांत तुम्ही ?

**नानी :** तुमचं क्षेम आहे ना ?

**सदा :** (नानीकडे न्याहाळून पाहतो) अरे म्हणजे तुमचं मुद्धा नानांच्या सारखंच झालं आहे की काय ?

**नानी :** सदाशिवराव भाऊ बसा अंमळ. मी आपल्याला चहा करुन आणते.

**सदा :** चहा ? आणि माझ्यासाठी ? नानी, तुमचा काहीतरी गैरसमज झालेला दिसतोय. मी सद्या पोळ आहे — ज्याला तुम्ही नेहमी वळू म्हणता तो. . . .

**नानी :** बसा आपण. मी येते . . (जातात).

**मंदा :** नाना. . . नाना. . . अहो हा प्रकार काय आहे ? मी तर भांबावून गेलो आहे. (बाहेरुन विश्राम येतो. हा नानांचा मुलगा. कॉलेजात जाणारा).

**विश्राम :** मी आलो आहे नाना. तुमच्या कामात व्यत्यय येत नसेल तर आत येतो.

**नाना :** ये बरं बाळ. कसलाही व्यत्यय येणार नाही. प्रातःकाळ-पासून तू कुठं गेला होतास ?

**विश्राम :** बॅडमिंग्टनच्या क्रीडेसाठी गेलो होतो आणि आता फक्त वस्त्रांतर करण्यासाठी परत आलो होतो. लगेच जाणार आहे.

**नाना :** अन्नग्रहणाच्या वेळी वेळेवर येणे करावे.

**विश्राम :** आम्ही अन्नग्रहण बाहेरच करु. . .

**नाना :** आम्ही म्हणजे मी समजलो नाही.

**विश्राम :** मी आणि. . .आणि. . .सुलोचना. . .

**नाना :** आम्ही इतकं सांगितलं तरी सुलोचनाच्या बाबतीत आपले लोचन उघडत नाही ना ? (सौजन्य सोडून) लाज नाही वाटत बापाच्या तोंडावर सरळ सरळ सांगायला ? दीड दमडीची अक्कल नाही आणि प्रेम करायला निघाले आहेत शहाणे ! कुठं जाणार आहेस तिला घेउन ?

**विश्राम :** चित्रपट पाहण्यासाठी.

**नाना :** चित्रपट ? अरे, तुझ्या नादानपणाला काहीं सीमा ? कुठली कोण सुलोचना आणि निघालास तिच्या गळयात गळा घालून—

**विश्राम :** माफ करा नाना – पण वस्तुस्थितीचा विपर्यास होतो आहे तुमच्याकडून----मी तिच्या गळयात गळा घालून जाणार नाहीं. जमलंच तर हातात हात फक्त घालून जाईन.

**नाना :** (रागावून) थोबाड फोडून टाकीन तुझं– काय समजलास तूं स्वतःला ?



अनुक्रमणिका

**सदा :** आता तुम्ही नेहमीचे नाना वाटता.

**नाना :** (सदाशिवला) तू गप्प बैस . . विश्राम, मूर्खपणा करू नकोस. . . माझ्याशी गाठ आहे.

**विश्राम :** नाना, मी तुम्हांला एवढंच सांगतो की, तुमचं सौजन्य सुटतं आहे ते सांभाळा. असं चार चौघांत सौजन्य सुटणं वरं नव्हे.

**नाना :** (एकदम नरम) ठीक आहे. केवळ सौजन्य सांभाळण्यासाठी मी तुझी गय करतो. पण एकदा का सौजन्यभास संपला की, मग तू आहेस आणि मी आहे एवढं लक्षांत ठेव.

**सदा :** नाना–नाना–अहो हा प्रकार तरी काय आहे ?

**विश्राम :** मी वस्त्रांतर करून जाऊ ?

**नाना :** केवळ सौजन्यापोटी जा म्हणून सांगतो मी तुला. एरवी नकोच म्हणालो असतो.

**विश्राम :** ऋणी आहे मी आपला यावद्दल – (जातो)

**सदा :** नाना भुताटकी तर नाही झाली या घरात ? नेहमी गाणे म्हणत आडदांडपणे घरात येणारा हा तुमचा विश्राम चक्क कोकरासारखा अदवीनं घरात आला काय तुम्ही रागावूनही तो अदवीनं बोलला काय. . . छे : छे : नाना माझं डोकंच फिरायची वेळ आली आहे. तुमचं सौजन्य काय, ते सुटायचं काय–काही एक कळेनासं झालं आहे मला. हे गौडबंगाल तर नव्हे ?

**नानी :** अरे गौडबंगाल वगैरे काही नाही. तुला माहीतच आहे, आमचं हे घर म्हणजे अगदी वाजती आणि गाजती वास्तू आहे. पोरं दिवसभर काही ना काही तरी वाजवीत असतात. विश्राम तवला, टेवल किंवा रिकामा डवा बडवीत असतो. मंदा पेटी वाजवते आणि पेटी हाताशी नसते तेव्हा तोंडानं शिट्टी वाजवते. तुझी नानी दणादण भांडी वाजवते—दिवसातून दोनचार वेळा दारं खिडक्या धडाधड वाजवते आणि मी, हे सर्व वाजवणं वंद करा, वंद करा असं ओरडून तोंड वाजवतो. आमच्या ह्या सामुदायिक आवाजात शेजाऱ्यांचं डोकं उठतं. शेजारी हलक्या डोक्याचे असं गृहित धरलं तरी इतका आवाज घरात सतत चालू राहणं वरं नव्हे. अरे, आमच्या घरात शांतता औषधापुरतीसुद्धा नव्हती. शांतपणे मरायचं म्हटलं तरी शक्य झालं नसतं. झालं नसतं काय, झालं नाहीच. माझी व्याण्णव वर्षाची म्हातारी आजी कितीतरी दिवस इथे मरू बघत होती; पण तिला इथे मरण आलं नाही. शांतपणे मरण्यासाठी शेवटी तिला पंढरपूरला न्यावं लागलं. तूंच पहा आता. घरावाहेर अनंत प्रकारच्या आवाजांनी डोकं उठतं, घरी यावं तर घरात आवाजाचा नुसता हाहाःकार उडालेला असतो. तवला, पेटी, भांडी आणि शब्द या सर्वांचे मिळून नादब्रह्म उभे राहिलेले असते.

**सदा :** म्हणून तर तुमच्या घराबद्दल आज मला भलतंच आश्चर्य वाटत आहे. शेजारी सांगतात की, तुम्ही सर्वजण भांड भांड भांडता आणि शेवटी भांडी आपटता.

**नाना :** (एकदम उसळून) महामूर्ख आहेत शेजारी. त्यांचं काय ऐकतोस (एकदम सौजन्याची आठवण होऊन) नाही . . . म्हणजे शेजारी तसे चांगले आहेत पण अतिशयोक्ति करतात नेहमी. आता भांडण्याच्या बाबतीत म्हणशील तर थोडसं खरं आहे. कारण आमच्या घरात लोकशाही आहे. म्हणजे असं की, घरातल्या प्रत्येक माणसाला स्वतंत्र मत आहे आणि आपले मत आग्रहानं वा प्रसंगी ओरडून मांडण्याचा सर्वांना अधिकार आहे. मतांच्या संघर्षालाच आपण भांडण म्हणतो.

**सदा :** तरी पण कुणी तरी जादा भांडत असतील, कुणी तरी कमी भांडत असतील.

**नाना :** तसं समजू नकोस. प्रत्येकजण खंबीर आहे भांडायला.

**सदा :** सगळी जणं एकदम भांडतात ?

**नाना :** सगळीजणं एकदम भांडतात म्हणजे प्रत्येक वेळी टीम वेगळी असते. कधी मी विरुद्ध नानी असा एकेरी सामना असतो, तर कधी मंदा विरुद्ध विश्राम असा सामना उभा राहतो. कधी मंदा, विश्राम, नानी विरुद्ध एकटा मी.... तर कधी मी व विश्राम

[पृष्ठ ६३ वर पहा]

शेवटी सौजन्य (धोतर नव्हे) सुटलेच !



## ओसाड माळ...तिथं आतां पिकेल सोन्याचं रान!



शेकडों वर्षे ही भूमि ओसाड पडली होती. शापामुळें शिळा होऊन पडलेल्या अहिल्येचा प्रभु रामचंद्राच्या पदस्पर्शानें उद्धार व्हावा त्याप्रमाणें कालवे-पाटबंधाऱ्याच्या पाण्यानें या भूमीला केवळ जीवनच नव्हे तर नवजीवन प्राप्त झालें. भरघोस पिकांनीं ही भूमि आतां बहरून गेली आहे.

ओसाड पडलेल्या अशा हजारों एकर जमिनींचा विकास घडून यावा, तेथें धान्याची भरपूर पैदास व्हावी म्हणून आयुर्विमा कॉर्पोरेशन आर्थिक सहाय्य करीत असते.

आपल्या देशाच्या भरभराटीला सहाय्यक ठरणाऱ्या योजनांमध्यें आयुर्विमा कॉर्पोरेशन दररोज सुमारे ३० लाख रुपये गुंतवीत आहे.

मार्च १९६५ पर्यंत आयुर्विमा कॉर्पोरेशननें केलेली गुंतवणूक

खतें, रसायने वगैरे—रु. ५,४५,१८,०००
मळे—रु. २,५७,८८,०००
मध्यवर्ती आणि
राज्य सरकारची कर्जे—रु. ४,४७,०७,०००
मॉर्गेज बँकांना दिलेली कर्जे—रु. २२,५६,४०,०००

**तुमचें कल्याण हीच आमची जबाबदारी.**

# लाइफ इन्शुअरन्स कॉर्पोरेशन ऑफ इंडिया



M/661





अनुक्रमणिका




# अंदमान ते आनंदमान

## [ पर्व पहिले ]

### प्रश्नचिन्हातला सूर्योदय

स्वातंत्र्यपूर्व काळ आणि स्वातंत्र्योत्तर भारताचे भाग्यशाली पर्व असा दोन्हींना स्पर्श करणारा एक अवधि होता. इ. स. १९४० ते १९४७ चा सात आठ वर्षांचा हा कालखंड मोठा संमिश्र ठरला. विशेषतः सरकारी नोकरीत शिरलेली तरुण पिढी ही अनेक भाव भावनांनी आंदोलित तशीच आनंदित होत गेल्याचा हा इतिहास म्हणावा लागेल. इंग्रजी शासनाची

[ह्या बेटाने महापुरुष मांडीवर खेळवले (आणि गिळलेही) पण आता 'अंदमान' हे 'काळे पाणी' राहिलेले नाही. त्याचा आता कायाकल्प (व हृदयपालटही) झाला आहे. समर्थांच्या भूमीतल्याच एका तरुण, कर्तबगार माणसाने हे 'आनंद वनभूवन' पाहिले–घडविले आहे. आता तेथे पाणी उदंड (व स्वच्छही) जाहले आहे. 'काळ्या पाण्याची' (आरपार) कांति पालटली आहे. त्या सुरस कायाकल्पाची कलापूर्ण व वेधक कहाणी–त्या कायाकल्पाचे शिल्पकार, अंदमानचे माजी चीफ् कमिशनर श्री. माधव राजवाडे (आय्. ए. एस्.) ह्यांच्याच शब्दात आम्ही सहर्ष सादर करीत आहोत. श्री. राजवाडे हे प्रथम लष्करात होते. त्यानंतर ते सिव्हिल सर्व्हिसमध्ये आले. हैद्राबादचे पोलिस अॅक्शन नंतर तेथील शासनव्यवस्थेसाठी जे निवडक अधिकारी पाठविण्यात आले होते त्यात ते होते. नंतर दिल्लीला ते गृहखात्यात उपसचीव होते. तेथूनच त्यांची अंदमानचे चीफ् कमिशनर म्हणून नियुक्ति झाली. सध्या ते महाराष्ट्र राज्य शासनाच्या उद्योग आणि मजूर खात्याचे सचीव म्हणून काम करीत आहेत. अंदमान म्हणजे केवळ काळेपाणी नव्हे ह्याची साक्ष पटविणारी ही कलापूर्ण (व आगळी) कहाणी 'दीपावली'च्या वाचकांना खात्रीने आवडेल. ठेवू या प्रस्थान—संपादक].

शिस्त आणि आपल्या स्वतंत्र देशाची घडी वसवण्याची शिकस्त यांचा सुरेख संगमच देशाला तारेल अशी त्यांची धारणा होती आणि अजूनहि आहे. मानवी शाश्वत मूल्यांचे सतत अनुसंधान ठेवून त्याचा योग्य त्या वेळी शासनात विनियोग केल्यास शासनाची पातळी उंचावते ही निष्ठा माझ्या मनात नेमकी केव्हा दृढमूल झाली हे विश्लेषित करणे जरी कठिण असले तरी ती माझ्या वैयक्तिक आणि व्यावसायिक आयुष्याची अबाधित प्रेरणा बनून राहिली आहे. . . . . .

इ. स. १९५८–मेचा महिना होता. अंगअंगातून सारखा निघणारा आणि कपड्यांना अखंडपणे ओला करणारा घाम, इरेस पडून स्वतः भोवती गिरक्या घेणाऱ्या विजेच्या पंख्याला जुमानत नव्हता. एके संध्याकाळी काम संपवता संपवता विचार आला कीं, 'तनमना'ने कर्तव्य करण्यात 'तन' कुठेतरी अडखळण्याची किंवा थकण्याची चिन्हे तर नाहीत ना? यात कामाची कसूर होऊ नये याची जागरुकता आली आणि काही दिवस एखाद्या थंड हवेच्या ठिकाणी जाऊन यावं असं वाटलं. वरिष्ठ अधिकाऱ्यांना मी माझा मानस कळवला. त्यांनी 'शनिवारपर्यंत थांब' असं सूचवलं. हे उत्तर तेवढं अपेक्षित नव्हतं. उत्तरात निरुत्साहि करण्याचा इलेप नव्हता पण काय होतं हे सुस्पष्ट नव्हतं. अवोधात कुठंतरी बदल होणार याची चाहूल लागली होती. . . .







## शाप कीं सम्मान-?

—मग 'तुला अंदमानात हद्दपार केलं आहे' अशी मिस्किल आज्ञा आली. —त्या मानानं धक्का बसल्यागत माझ्या मनाची तीव्र प्रतिक्रिया झाली नाही. एक तर असे कीं, अनौपचारिकतेनं सुनवल्या गेलेल्या त्या आज्ञेच्या स्वरात माझी खास निवड झाल्याचा ध्वनि प्रतित होत होता. दुसरे असे कीं, त्या वेळेपर्यंत अंदमान बेटाच्या मुख्य कमिशनर पदीं वयाने आणि अनुभवाने सिनिअर असलेल्या अधिकाऱ्यांची नेमणूक करण्याची प्रथा होती. मजसारख्या चाळीशीची उंबरठा नुकत्याच ओलांडलेल्या आणि तुलनेनं तरुण असलेल्या अधिकाऱ्याची या महत्वाच्या जागी निवड करण्यात या प्रथेचं वळण बदलले होते हे खरेच. परन्तु तसं करण्यात तरुण माणसाच्या उत्साहाचा आणि धडाडीचा बेटांच्या सुधारणेला, गतीला आणि विकासाला—विशेषतः पंचवार्षिक योजना फलप्रदरीत्या मार्गस्थ होण्याला हातभार लागावा अशी अपेक्षा अनुस्यूत होती. मानानं उंची आणि जबाबदारीनं मोठी, कर्तृत्वाला भरपूर अवसर देणारी आणि कामाला अपार—अशा जागेवर आपली नियुक्ति झाली यानं व्यक्तिमत्व सुखावलं हे कबूल करण्यात अनाहूत सौजन्याचा मी अंगिकार करत आहे असं नाही. अर्थात् या जागेच्या अनुषंगाने येणारी जिम्मेदारी आणि तिच्याशी संवद्ध अशी वरिष्ठांची आणि लोकांची अपेक्षा यांची जाण पुरुषार्थाला आतून आव्हान देऊ लागली हेहि नाकारण्यात अर्थ नाही. शासनात तुलनेनं कमी जबाबदारीची किंवा संयुक्त जबाबदारीची कामं अधिक निश्चितपणे व बिनधोकपणे करता येतात हे खरं आहे. पण त्यावरोबरच कल्पकतेला कमी वाव आणि तोचतोपणाचा ठाव या मर्यादाहि कार्य प्रभावीपणे फाकू देत नाहीत हे साहजिक आहे. पण जिथे कामाचा पूर्ण भार असतो आणि अधिक स्वातंत्र्य असते तिथे मूर्त कार्याला खूपच अवसर असला तरी झालेली किंवा घडलेली चूकहि, संबंध असो वा नसो, स्वतःच्या अंगावर झेलून किंवा पेलून घ्यावी लागते. त्यात प्रवाद असतात, आरोप असतात, अप्रियता असते आणि केव्हा केव्हा बदनामीलाहि तोंड द्यावे लागते. व्यक्तिमत्वाची उर्ध्वगामी जडण-घडण अशातूनच साकारत असते. नित्य नेमिकमाच्या ठराविक चाकोरीतून सरपटणाऱ्या सरकारी नोकराच्या जीवनात विरलत्वाने येणारा हा योग सुयोग करण्याची नामी संधीच विधात्याने जणु आपल्यास दिली आहे असा अलिखित आदेश माझ्या अस्मितेला स्पर्शून उत्तेजित व प्रेरित करू लागला......

—या मुळेच माझ्या एका शरीराने परस्थ व दूरस्थ (पण मनाने जवळ) नातेवाईकाचे जेव्हा अगत्याचे पत्र आले कीं, 'तू गेल्या जन्मी काय पाप केलेस कीं, त्याची फळे तुला आता अंदमानला [illegible] भोगावी लागणार' तेव्हा मला त्याला कसे व काय उत्तर द्यावे हा क्षणभर प्रश्नच पडला. स्वातंत्र्यपूर्व काळी अंदमान आणि गुन्हेगार असे समीकरणच होते. अट्टल गुन्हेगारांना



श्री. माधव राजवाडे

अंदमानी शिक्षा भोगावी लागे. परन्तु अंदमानबद्दल एकंदरीत प्रतिकूल ग्रह व्हावयास आणि भावनेची कटुता उग्र व्हावयास मुख्य कारण म्हणजे आपल्या काही पूज्य व प्रातःस्मरणीय अशा देशभक्तांना (त्यांची संख्या मोठी नव्हती तरी) शिक्षा भोगावयास तिथे पाठवण्यात आले होते.—आणि तसा ग्रह करुन घेतला म्हणून कुणास दोषी ठरवणे संयुक्तिक होणार नाही. परन्तु परकियांची सत्ता नाहीशी झाल्यावर आणि आपले राज्य आल्यावर अंदमानहि आपल्या इतर प्रदेशाइतकाच भारताचा झाला. केवळ सागराने तुटला म्हणून नात्यानेहि तुटला असे थोडेच? —किंवहुना दूर असलेली आणि आंग्ल शासनाने केवळ स्वतःच्या सोयीकरता आणि स्वार्थास्तव दूर केलेली माणसं स्वतंत्र भारतात कशी वेगळी राहणार? अंदमान बेटे म्हणूनच केन्द्रशासित बनली व त्यांचे शासन व्यवस्थित चालवण्यास व अवरुद्ध प्रगति मार्गस्थ करण्यास खास कमिशनराची नियुक्ति झाली. त्या पदावर मी जात होतो. एका परीने सूचित गौरवास यथार्थ करण्याची ती महनीय कामगिरी होती. भारतीय घटनेच्या संदर्भात जनसुखाय—जनहितायचा कल्याणकारी राज्यानं संकल्प सोडलेला आहे. तो सिद्धीस नेण्यात आपल्या परीनं जोड देण्याचे जणु धर्मकार्यच मजकडे चालून आले. लोकशाहीच्या जगन्नाथाचा रथ असा ओढल्यानेच नराचा नारायण आणि देशाचे सुजलाम—सुफलाम होणार. माझ्या मनाची तार ही अशी लागलेली असल्याने मला वाटले कीं, अंदमान बेटावरची आपली नियुक्ति ही कुणी









अनुक्रमणिका

शाप मानत असेल तर त्याला सांगितलं पाहिजे कीं, हा एका परीनं सम्मानच ( Blessing in disguise) आहे !

## मांजर नव्हे, कोण आडवं आलं ?

प्रवासास निघालो–अगदीं मनात काही एक न ठेवता निघालो. म्हणजे मनात पूर्व ग्रहांना थारा नव्हता. नवी माणसं, नवा प्रदेश याना मोकळ्या मनानं पाहायचं, ऐकायचं. आणि आपण त्यांच्यापेक्षा फार उच्च आहो, वेगळे आहो, शहाणे आहो, असं जाणवूं नये असं वागायचं. शिकवण्यापेक्षा शिकायचं अधिक. अनुभवाचं विश्व संपन्न करायचं. स्वकियांचा निरोप घेताना आणि बोटीवर चढताना माझ्या मनात ज्या विचारांनी फेर धरला ते असे होते. बोटीची सूत्रें जरी कप्तानाच्या हातात असली तरी बोटीचा मालक मूख्य कमिशनरच असतो–मला प्रश्न पडला कीं, वेळ झाली तरी बोट निघत कां नाही? काहीं तरी कारण असेल या विचारानं मी पुन्हा मनात प्रवर्तित भावभावनांची रवंथ करू लागलो. एकीकडे अबोध हुरहूर तर दुसरीकडे उत्साह अशी मनाची स्थिति होती......

संध्याकाळी भोजनाच्या वेळेस मी सहज कप्तानाला विचारले 'बोट उशीरा कां निघाली?' त्यानं प्रथम हंसण्यावर नेलं. नंतर कळू नये अशा शिताफीनं टाळाटाळ केली. परन्तु मीहि खेळमेळीनं जेव्हा कारण जाणण्याची इच्छा सतत चालू ठेवली तेव्हा तो म्हणाला 'आता लपवून ठेवता येणार नाही. आणि तुमच्यापासून काय लपावायचं?–बोट सोडणार तोच डेकवर एक छानसं कुत्रं दिसलं. कुत्र्याकडे पाहत बसावं वाटलं. पाहत बसलो असतो तर बोट सुटली नसती आणि बोट सोडावयाची म्हणजे कुत्रे डेकवर असताना नेणे शक्य नव्हते. बोटीच्या नियमाप्रमाणे मोकळे नेण्यास कुत्र्यांना प्रतिबंध होता. चौकशी करतो तर कळलं कीं, ते आपलं कुत्रं होतं. मोठा पेंच पडला मला. कुत्रं सर्व नियम बाव्यावर बसवून न्यायचं कसं?–आणि तसंच नेलं, उद्या कुणी विचारणी केली किंवा चौकशी झाली तर त्या वेळेस जाब काय द्यायचा? संभ्रमित झालो. काही सुचेना. पण अधिक वेळ दवडून चालण्यासारखे नव्हते. विचार करू लागलो. कल्पनेला ताण दिला. एक पर्याय सूचला आणि तो लगेच अमलात आणला. कुत्रं जर क्रेटमधे नेलं तर चालण्यासारखं होतं. परंतु ऐनवेळी रिकामा क्रेट मिळवायचा कसा? जादा क्रेट नव्हता. कसं करायचं? त्यातूनंहि माझ्या कल्पनाशक्तीनं वाट काढली. मी बटाटचांचा एक क्रेट रिकामा केला, त्यांत आपल्या कुत्र्याला ठेवलं आणि बोट सुटली! यामुळे वेळ झाला——'

## सूचक अनुभव

— मला नंतर कळलं कीं, बोटीचा कप्तान हा कुत्र्यांचा अस्सल शौकीन होता. त्याचं बेटावर आणि घरी असं दोन्हीकडे लाडकं कुत्रं होतं. माझं कुत्रं पाहिल्यावर त्याच्या लक्षात आलं कीं, मालकाला सोडून राहणारं हे कुत्रं नव्हे ! कुत्रं इतकं लावून घेतलेल्या माणसाला याचा मालक सारं सोडेल पण या कुत्र्याला सोडून राहणार नाही असंहि कदाचित् वाटलं असण्याची शक्यता आहे! नागरी शासनातील सेवकांच्या मानाने नौकादलातील नोकरांची वर्तणूक अधिक शिस्तशीर असते तशीच ती निर्भयहि असते याची बारीक चुणूक या प्रसंगानं प्रत्ययास आणून दिली. या प्रसंगानं एकीकडे सेव्य–सेवक संबंधाच्या मर्यादेतहि औचित्य व रसिकतेची नाजुक जपणूक करता येते हे दिसले तर दुसरीकडे मनाला असा विचार स्पर्शून गेला कीं, मनावर घेतले तर एकमेकांची सोय होईल असा पर्याय सहज निघूं शकतो. अडचणी आणि अडसर हे येणारच पण त्यांने अडून बसायचे नसते, पुढे जायचे असते. प्रगतीचा स्रोत चालू राहील याची यत्नशीलता कमी व्हायची नसते. पुढे न अडखळता काम करायचे आहे अशा सूचनेची अचुक खूणच या एका छोटचा प्रसंगात फडफडत असल्याचा मला भास झाला. आपला अधिकार सत्ता दाखवण्याकरता नसून राबवण्याकरता आहे. शासनाकरता शासन नसून ते लोकांच्या करता आहे याचं अवधान अविरत बाळगून काम करावयाचें आहे. मर्यादित राहावयाचें आहे पण मर्यादेत नीट पाय रोवून काम केल्यास ते कामच विकासाचा सोपान बनणार आहे. आपणच सारे पूर्ण व संपूर्ण करू असा दिमाख बाळगून चालणार नाही. अगत्य तर बाणवायचे पण आसक्ति बाळगायची नाही. निरपेक्ष बनावयाचे पण निष्क्रिय व्हायचे नाही. योजनेने काम करावयाचे पण उत्साह आणि स्वयंस्फूर्ति याच 'बोलविता धनि' राहिल्या पाहिजेत. झाल्या पाहिजेत. सगळे काम आखीव व रेखीव व्हावे पण साचेबंदपणा नसावा. मनांत, वचनांत आणि आचरणांत अशी अभंग 'टिक् टिक्' चालू असताना जे जे करू व करत जाऊ त्याची फळे व परिणाम आपणास पाहावयास व भोगावयास मिळणार नाहीत याची यत्किंचितहि खंत नसावी यातच अशा अनुभवाची खुमारी असते असं वाटलं. वास्तविक अशा कामाची 'लगन' लागणेंच, त्याची एका अर्थानें पूर्ति नव्हे काय?–एक साधा प्रसंग पण त्याने माझ्या मनांत असा फेर धरला आणि माझ्या मनःचक्षूपुढे सुप्रसिद्ध आंग्ल कवि शेले याने इंग्लडच्या पुरुषांना उद्देशून लिहलेल्या पुढील ओळी नाचू लागल्याः–

The seed you sow, another reaps;
The wealth ye find, another keeps;
The robes ye weave, another wears;
The arms ye forge, another bears.

या ओळी मागून लगेच शेलेच्या त्याच्या पुढच्या ओळी नृत्यशील न बनता पण मंद गतीने आल्या व ठामपणे समोर उभ्या राहिल्याः–

Sow seed,—but let no tyrant reap;
Find wealth,—let no imposter keep;
Weave robes,—let not the idle wear;
Forge arms,—in your defence to bear.

मी स्वतःलाच प्रश्न केला, 'हे सारं जमेल आपल्याला ? हे व्रत आहे आणि ही कसरतहि आहे–' आणि मनाच्या खोल

गाभाऱ्यातून 'तुतारी' निनादली

'प्राप्तकाल हा विशाल भूधर,
सुन्दर लेणी तयांत खोदा,
निजनामें त्यांवरती नोंदा,
बसुनी कां वाढविता मेदा?
विक्रम कांहीं करा, चला तर!

माझे बाहू फुरफुरले. अस्मितेतून कुठून तरी हे आव्हान स्वीकारल्याचा प्रतिसाद आला. काही करून दाखवू असा निर्धार विचारांना तेजाळू लागला. क्षणापूर्वीची दोलायमान अवस्था गेली. उमेदीचा भाव स्थिर झाला. आत्मविश्वासाचे वलय संजीवक इंद्रधनुष्य बनले. मी आत्मरत झालो....

## स्वगत

– असे झाले म्हणजे मनुष्य वरकरणी सगळ्यात असतो पण मूळात स्वत:जवळच असतो. स्वभावत: माणसापासून वेगळे राहावे, वागावे असे मला वाटत नाही. अधिकारपदामुळे मोकळेपणाची जी काही पथ्यें पाळावी लागतात ती सोडली तर खेळ, गप्पा आणि माणसे यात रंगणारा जीव आहे मी. पण लोकांना तसं दिसावं आणि वाटावं असा प्रयत्न व प्रदर्शन करणं मला मुळीच आवडत नाही. पदोपदी असं नेहमी जाणवत आलं आहे कीं, सरकारी अधिकारी आणि लोक यांच्यातलं अंतर उभयपक्षी उरी बाळगलेल्या गैरसमजामुळे व अहंकारामुळे सतत वाढत आलं आहे. हे अंतर एकट्याच्या प्रयत्नामुळे एका रात्रीत नाहीसे होणारे नाही. परन्तु जिथे जिथे संबंध येईल आणि संपर्क साधेल तिथे तिथे सहजतेने आदान-प्रदान वाढल्याने एकमेकाकडे पाहण्याची वक्रता नक्कीच कमी होण्याची शक्यता असते. हे वागणे, परस्परावलंबी व परस्परपूरक नात्याच्या सामाजिक आशयाचे अनुसंधान बाळगणे ज्याला उच्चपद प्राप्त झालेले असते त्याला आवश्यक असते. फरक एवढाच असतो कीं, शासनाच्या एका विशिष्ट चौकटीत अडकूनही तसे अडकलो असे जाणवू द्यावयाचे नाही. इतर व्यवहारासारखा तोहि एक व्यवहार. वागणुकीत कुणाची गैरसोय न करता चपखलपणे बसला पाहिजे. इतरांना तसे वाटलेहि पाहिजे.

## प्रवासाचे निराळेपण

बोट म्हणजे एक वसति असते. ती एकसंध नसते. कारण निरनिराळी माणसे एकत्र आलेली असतात. इतर प्रवासाच्या मानाने बोटीवर भेटण्याचे प्रसंग वरचेवर येतात. एकतर प्रवास अनेक दिवसांचा असतो. दुसरे असे कीं, नेहमी आपण ज्या माणसांनी भरलेल्या व माणसाळलेल्या जगाला रुळलेले असतो ते नसते. शिवाय समुद्रावरच्या प्रवासात नेहमी भूमीवरची जी स्थिति आणि गति असते ती अनुभवास येत नाही. यामुळेच बोटीवरचा प्रवास सर्वांनाच मानवेल अशी खात्री कुणासहि देता येत नाही. किंबहुना तो मानवला नाही किंवा मानवत नाही याची उदाहरणेच अधिक. 'बोट लागणे' हा शब्दप्रयोग बोटीचा प्रवास न मानवण्याच्या बहुसंख्य उदाहरणामुळेच रूढ झाला असावा. पाण्यावर तरंगणाऱ्या आणि सरकणाऱ्या बोटीच्या हलण्यात, हिंदकळण्यात आणि नाकात घुसणाऱ्या खाऱ्या वाऱ्यामुळे जमिनीवर वावरणाऱ्या माणसाच्या एकंदर शारीरिक रचनेला धक्का बसणे साहजिक आहे. बोटीच्या प्रवासास ज्याला ज्याला निघावे लागते त्याला त्याला या प्रवासाचे वर्णन व ज्ञान परोक्ष-अपरोक्षपणे कळलेले असते. कळत जाते. मला वाटते कीं, काहींच्या बाबतीत या ऐकीव गोष्टीमुळेच भयगंड निर्माण होऊन बोटीवरच्या प्रवासाचे समवस्थापन (adjustment) कठिण असावे.

## एक काळजी

माझ्या पुरते बोलावायचे झाल्यास मला काळजी होती माझ्या शोभाची. मी सहकुटुंब निघालो होतो. मला कुटुंबाखेरीज (माझ्याच!)

राहता येत नाही हा माझा दोप खराच. परन्तु वोटीवर चढायच्या अगोदर आणि चढल्यानंतर मला पत्नीवद्दल काळजी नव्हती. कारण तिला वोट लागत नाही हे अनुभवाने पक्के झाले होते. शोभा चार वर्षांची होती आणि सागरी सफरीचा हा तिचा पहिला प्रसंग होता. त्यात ती आमच्या मते असावी तितकी सुदृढ नव्हती. हाडकुळी होती. अशक्त वाटे. प्रत्येकालाच आपले पोर प्यार असते. विशेप वाटते. परन्तु शोभा तिच्या वयाच्या मानाने खूपच तल्लख होती. त्यात ती आमचे एकुलते एक पोर. त्यामुळे तिला वोट लागली तर आम्हा दोघांना ती एक चिते१ टाकणारी समस्या ठरणार होती. पोरं म्हणजे वहुतेक पालकांची नरम जागा असते हे काही नव्याने सांगावयास नको. अगदी धीर व घट्ट म्हणवणारी माणसं वत्सल रसाने ऋजू होतात. करुणेने मऊ पडतात. अगदी अपरिचित व जिम्मेदारीच्या दृप्टीने सर्वस्वी भिन्न अशा जागी जात होतो त्याची मला मुळीच चिंता नव्हती, मात्र ज्या मुलीला चार वर्पे वाढत असलेली पाहिली तिच्यावद्दलच काळजी वाटावी याचे कुणाला आश्चर्य वाटल्यास नवल नाही. अर्थात् झाले ते उलटेच. अगदी वोटीवर पाऊल ठेवल्यापासून शोभा वोटीवरच्या वातावरणात जी रमली ती प्रवास संपेपर्यंत तशीच समरसून राहिली. वोटीच्या कप्तानाशी व इतर सह प्रवाश्यांशी तिची चांगलीच गट्टी जमली. दिवसभर तिची भ्रमन्ति व वोलणे चालू असे. नाना चौकस प्रश्न विचारुन ती भंडावून सोडत असे. त्या भंडावण्याचे काही वाटले नाही कारण तिला वोटीचा प्रवास मानवला होता. तिला मौज होती.

## वेटांची चाहूल, वेटांचा कानोसा

माझ्या मनात आलं कीं, वहुतेक अधिकारी प्रथम स्वत: जातात आणि नंतर आपल्या कुटुम्वाला नेतात. तसं मी कां केलं नाही ? अंदमान नवं नव्हतं केवळ. अंदमान वेटांच्या वद्दल निव्वळ धूसरताहि नव्हती. अंदमानच्या भौगोलिक आणि नैसर्गिक पार्श्वभूमीवर वस्तुनिप्ठ विचार करून ग्रह थोडेच निश्चित झाले होते ? अंदमान म्हणजे सर्व वावतीत विपरित, काळेकुट्ट, आणि अंधेरनगरी असाच जो अनाठायी समज होता त्याला निदान आपण तरी वळी पडू नये असे माझ्या मनाने ठरविले. शिवाय जी जागरूक माणसे तिथे जाऊन आली होती त्यांनी सांगितले कीं, अंदमानावर अंधार करणारे मेघ दाटतात हे काही खोटे नाही. पण त्या मेघातून जीवनाचा वर्पाव होतो. सव्वाशे इंच पाऊस पडतो अंदमानात. अंदमान आणि निकोवारी वेटें ही अनुक्रमे २,५८० व ६३५ चौरस मैलाची असून समुद्राच्या अंकावर लिलया पहुडलेली आणि आपले हात उंच करून 'आम्ही येथे आहोत, हे रवी राजा' असे सांगणारी मातीची लेकरें आहेत ! ऐन समुद्राच्या मध्यातून जमिनीचा सूळका वर उफाळून यावा तशी उमटून उठलेली ही वेटें आहेत. समुद्राच्या तळापासून ही वेटें २२००० ते २४००० फूट उंच असून पाण्याच्या पातळीपासून ती २४०० फूट उंच आहेत. सरासरी उंची ११०० फूट आहे. इतरत्र समुद्र किनारा जो आढळतो त्याच्यावरून याची कल्पना करणे वरोवर होणार नाही. ज्याला समुद्र म्हणतो तो अशा किनाऱ्यापासून दूर असतो. ही वेटे ऐन समुद्रांतून डोके वर काढल्यागत आहेत. यामुळे या वेटांना वेढणारा समुद्र कसा स्वच्छ, पारदर्शक आणि हिरव्या निळ्या रंगांनी अलंकृत आहे. या वेटांचं हे समुद्रातून असं वर आलेलं स्वरूप माझ्या कल्पकतेला चुचकारू लागले. वाटलं कीं, जे समुद्रमंथन झालं ते या वेटांचा आधार घेऊनच झालं असावं.... अशा वेटाकडे समीपता वाढत होती. . . .

जेवणाने पोट जड झाले होते. शरीरहि गुस्तावले पण मनांत विचार चक्राकार झाले. देश सोडला नव्हता पण किनारा सोडला होता. एक किनारा सोडला पण दुसरा किनारा गाठायचा होता. एकंदर प्रथा थोडी वदलून भारतीय संविधानाला जवावदार असलेल्यानी मजसारख्या तरुण अधिकाऱ्याची नेमणूक करण्यात जो सापेक्ष विश्वास प्रकट केला होता त्यात आपण उणे पडू नये आणि सर्व अज्ञात शक्तीनी माझ्या कर्मयोगाला आशिर्वाद द्यावा असं मला तीव्रतेने वाटलं. मी आरपार, अंगावर आलेली कर्तव्यें शिताफीने, कौशल्याने आणि जीवाचा प्राण करून वजावेन अशा इरेने भारला गेलो होतो. यात फुशारकी किंवा ऐटीपेक्षा अंगिकृत कार्याची सूक्ष्म आणि स्थूल जाणीवच अतिशय जागरूक होती. या भावनेनेच वेडा पार करावयाचा होता. . . .

वोटीवर, डोळ्यांना परिचित असा, कवींनीं आणि लेखकांनी रंगवलेल्या जमिनीवरच्या छाया प्रकाशाचा लपंडाव दिसत नाही. संध्या-प्रकाशाच्या सीमा केव्हा मिटतात व कशा फिटतात हे कटाक्षाच्या आणि कल्पनेच्या चिमटीत पकडता येत नाही. शिवाय वोट लागू नये म्हणून जे औपध (avomine) देण्यात येते त्याने एक प्रकारच्या गुंगीचा अमल सुरू होतो. जाग नसल्यासारखे वाटते पण जाणीव असते. जाणीव येते पण देह पूर्ण साथ देत नाही. अशी रूख रूख परेशान करते. दिवसरात्र आणि ऊनसाऊली ही जणु निसर्गाच्या डोळ्यांची उघडझांप वनते. दिवसांचा एक दोन असा संख्यावाचक क्रम लोपतो आणि वाटते कीं, वाहणाऱ्या काळाने आणि प्रवाहाने त्याना गिळून टाकले आहे. . .

— अशा अवस्थेत एक विचित्र अस्वस्थता मनाला ग्रासून जाते. वंधनाच्या आत आणि अतीत नसलेले हे जीवन कोणत्या आदि आणि अंताच्या तंतूने जखडलेले किंवा निवद्ध आहे ? सतत असेच जीवन जगावे लागले तर अनुभवाची आणि त्याच्या आविप्काराची परी कशी राहत असेल ?— असे विचार चालू असतानाच नजरेला वदल जाणवला. तो वदल नजरेतील वुवुळांना गुंगीतून वाहेर येण्याकरिता लाघवाने खुणावू लागला. हे खुणावणे मनाला गुदगुल्या करणारे वाटले. गेल्या चार दिवसात मन व डोळे आपल्या नेहमीच्या अनुभवाचा वारसा हरपून हिसळत होते. त्यांना रंगाचा विलास दिसला. गगनचुंवी वृक्ष दिसले. जमीन दिसली. माती, होय मातीची ओढ जागली. रोम न् रोम शहारले. आनंदाने पल्लवित झाले. फुलारले. उचंवळले. वेफाम लाटांनी वंडखोर वनवलेले खारे वारे अंगाला झोडपणे ओसरले. नारळीच्या पंखांनी हिल्लोळलेले आणि वृक्ष राशीनी फुंकरलेले गार वारे शरीराशी चुंवाचुंवी करू लागताच ते कमालीचे चुस्त झाले. निकोवार वेट ज[illegible] आले होते. . .



लहरीवरती नाचत नौका, पुसती आले 'निकोवार' कां ?

[ क्रमशः ]



अनुक्रमणिका

## फ्रेंच चित्रपटातील




रमेश मंत्री

### [१]

## निदान ती वडी तरी....

काही वर्षापूर्वी मी एक फ्रेंच चित्रपट पाहिला. त्याचे नांव होते, 'ल कुशे' म्हणजे पलंग. त्या चित्रपटांत पलंगाविपयीच्या तीन वेगवेगळ्या कथा होत्या.

पहिली कथा होती एका ड्रायव्हरची. त्याचे नांव पॉल. तो दिवसभर ट्रक चालवीत होता. लांबचा पल्ला गांठायचा होता म्हणून रात्रीहि तो ट्रक मारीत होता. रात्रीचे बारा एक वाजले, तेव्हा तो थकला. निर्जन रस्त्यावर एका बाजूला त्याने ट्रक उभी केली आणि त्याला डुलकी आली.

'मेसुए, मेसुए' (अहो मिस्टर) अशी हाक ऐकू आली, म्हणून तो ःगबगीने जागा झाला. त्याच्या मोटारीजवळ एक सुंदर तरुणी उभी होती. तिला पाहून तो भांबावूनच गेला. ती अमीर उमरावांच्या घराण्यातली होती, हे स्पष्टच दिसत होतं. तिचे ते नाजुक लावण्य पाहून तो तिच्यावर एकदम खुप झाला. पण स्वतःचा ओबड धोबड अवतार लक्षात आल्यावर त्याने मनाला बांध घातला.

"मिस्टर, प्लीज मला जरा मदत करता का?" तिने अजीजीने विचारले.

"हो. हो. आनंदाने" खाली उतरत पॉल म्हणाला, "काय हवंय तुम्हाला?"

किंचित मागे वळून तिने आपल्या मोटारीकडे बोट दाखवलं. नि ती म्हणाली, "माझी गाडी बंद पडलीय. अशा निर्जन वाटेवर रात्र काढावी लागली, तर माझी काही धडगत नाही."

पॉलने पाहिले. त्याच्या मागे दहा वीस फुटांवर एक पांढरी शुभ्र, डौलदार कॅडिलॅक मोटार उभी होती. तो लगबगीने मोटारीजवळ आला. त्याने यंत्र खोलून पाहिले. मग तो जमिनीवर उताणा होऊन मोटारच्या खाली गेला. त्याला चटकन् काय करायला हवं ते कळलं. आपल्या टूल बॉक्स मधून त्याने दुरुस्तीचं सामान काढलं आणि पंधरा मिनिटात त्यानं मोटार पूर्णपणे दुरुस्त करून दिली. ती तरुणी त्याच्या त्या कसबाकडे मोठ्या कौतुकानं पहात होती.

ती म्हणाली, "मी फारच आभारी आहे तुमची. मी तुमच्या उपकारांची फेड कशी करू?" असं म्हणून तिनं पर्स बाहेर काढली.

"छे: छे: मी हे काम पैशासाठी केलं असं तुम्हाला वाटतं की काय?" असं



अनुक्रमणिका

म्हणून त्यानं त्या देकाराचा सौजन्यपूर्वक प्रतिकार केला.

किंचित विचार करीत ती म्हणाली, "मग तुम्ही असं कां करीत नाही? इथून पांच सहा मैलांवरच माझा बंगला आहे. तिथपर्यंत तुम्ही चला. थोडं ड्रिंक घ्या, रात्रभर विश्रांति घ्या नि मग पुढं चला. चालेल?"

चालेल म्हणजे काय? एका सौंदर्य-शालिनीने आपल्या घरी रात्री राहा असं म्हटल्यावर ते चालेल की नाही असा विचार करणाऱ्यापैकी पॉल नव्हता. त्याने आनंदाने रुकार दिला.

ती सुंदरी कॅडिलॅकमधून पुढे निघाली. आणि तो तिच्यामागून ट्रकमध्ये बसून निघाला. एका विस्तीर्ण हिरवळीवर कंपौंडमध्ये तिचा प्रशस्त बंगला होता. ती म्हणाली, "दुर्दैवाने आज आमच्या बंगल्यात कोणीच नाही. मी लवकर परत येणार नव्हते. म्हणून नोकर मंडळी दोन दिवसांनी पुन्हा कामावर येणार आहेत".

पॉलच्या मनात आलं, पोरी हे 'दुर्दैव' कोणाचं? माझं तर खचित नाही. ती म्हणाली, "तुम्ही खूप थकलेले दिसता. स्नानगृहात जाऊन आंघोळ करा. तेवढ्यात मी शँपेनचे पेले भरते".

पॉल आनंदून गेला. स्नानगृह अगदी अद्यावत होतं. त्यानं टबमध्यें गरम पाणी सोडलं. आरशात पाहिलं, तो दाढी वाढलेली दिसली. त्यानं जवळच्या कपाटाचं दार उघडलं. त्यांत दाढीचं सामान होतं. त्यानं दाढी उरकली. आता त्याला उल्हसित वाटू लागल. आंघोळीसाठी त्याने सावणाची पेटी उघडली. वा! काय प्रसन्न सुगंधी सावण होता तो! त्यानं आयुष्यात असा सावण पाहिला सुद्धा नव्हता. त्या रात्रीची आठवण म्हणून जाताना तो सावण न्यायचा, असं त्यानं ठरवलं. गरम पाण्यानं स्नान केलं. मग त्यानं आठवणीनं सावणाची वडी कोटाच्या खिशात ठेवली.

दिवाणखान्यात ती युवती त्याची वाटच पहात होती. तिनं शँपेनचे चपक भरले होते. त्या चपकांमध्ये बाटली ठेवली होती. मद्य पिता पिता ती त्याच्या जवळ बसली. त्याच्या हनुवटीवरुन हात फिरवीत म्हणाली, "आता किती छान दिसता तुम्ही?" त्यानंहि तिला वाहून घेतली. ती लाडात येऊन म्हणाली, "माझ्याच पलंगावर झोपा ना तुम्ही. मला एकटीला भीति वाटते." त्यानं ती सूचना आनंदानं मान्य केली.

"मेसूए, मेसूए" या शब्दांनी त्याची स्वर्गीय तंद्री भंग पावली. त्याने जड डोळे उघडले, तो दुसरा कोणीतरी ट्रक ड्रायव्हर त्याच्या समोर उभा होता. तो म्हणत होता, "तुमची गाडी जरा आणखी कडेला घ्या. ट्रॅफिकला त्रास होतोय ना.'

पॉलने पाहिलं दिवस उजाडला होता. पॉल आपल्याच ट्रकच्या सीटवर होता रस्त्याच्या बाजूला त्याची ट्रक उभी होती. त्याने दाढीवरुन हात फिरवला. ती वाढलेलीच होती. म्हणजे ती सुंदरी, तिचा तो बंगला, तो सुखदायी पलंग हे सारे स्वप्नच होते तर! त्याला एकदम आठवण झाली. आणि त्याने चटकन कोटाच्या खिशांत हात घातला. खिसा रिकामाच होता. आता मात्र त्याला फारच वाईट वाटलं. तो स्वतःशीच म्हणाला, "बाई नसली तर नसू देत, पण निदान ती सावणाची वडी तरी खरोखरची असायला हवी होती!"

'परकी' विनोद




...रं आप... ...ंगा, आपल्या प्रवासाचा हेतू?

## [२]

## मग धाडस करूं म्हणतेस?

दुसरी कथा होती एका डॉक्टरची. एका रात्री तो परगांवी रोग्याला तपासायला जात असताना त्याची मोटार मधेच बंद पडली. जवळपास गांव नव्हतं. लांबवर एक झोपडी दिसली. डॉक्टर तिथपर्यंत चालत गेला. प्रवासानं त्याला चरचरीत भूक लागली होती. त्यानं झोपडीच्या दारावर थाप मारली. एका रुक्ष, दांडगट शेतकऱ्यानं दार उघडलं. डॉक्टरनं सांगितलं, "मला आजची रात्र इथंच काढूं द्या." शेतकरी तिरसट होता, जरा अबोलच होता. त्यानं कुरकुरत 'हुं' म्हटलं. आणि कोपऱ्यातल्या एका खुर्चीवर डॉक्टरला बसायला सांगितलं. मग शेतकरी आणि त्याची पंचवीस वर्षांची सुंदर मुलगी जेवूं लागले. इकडे डॉक्टरच्या

पोटात कावळे कोकलू लागले होते, पण 'मला कांही तरी खायला द्या' असं म्हणायचा काही त्याला धीर झाला नाहीं.

जेवण झाल्यावर शेतकरी ढेकर देऊन झोपण्याच्या तयारीला लागला. झोपडीत एकच मोठा पलंग होता. त्याने डॉक्टरला सांगितले, "तुम्हींहि याच पलंगावर झोपा." भिंतीजवळ शेतकरी, त्याच्या-जवळ त्याची मुलगी आणि तिच्याजवळ डॉक्टर असे ते तिघे जण पलंगावर झोपले. जवळच्या शेगडीतील विस्तवाचा मंद प्रकाश खोलीत पडला होता. थोड्याच वेळ त शेतकरी घोरू लागला. डॉक्टर जागा होता आणि ती तरुणीहि अधून मधून डोळे किलकिले करून त्याच्याकडे पहात होती. थोड्या वेळाने तिने दब-लेल्या आवाजात त्याला विचारले, "का हो, झोप येत नाहीं वाटतं?"

"हुं" डॉक्टरने अस्फुट आवाजात सांगितले.

क्षणभर थांवून तिने सहास्य नजरेने त्याच्याकडे पाहून चोरट्या आवाजात म्हटले, "तुमच्या मनात काय आहे हे मी ओळखलं आहे."

डॉक्टरला जरा समाधान वाटले. तो म्हणाला, "खरंच ? मग तुला काय वाटतं?"

ती लाजून म्हणाली, "तुमच्या मनात आहे तेच माझ्या मनात आहे."

डॉक्टरच्या मनात आता विश्वास निर्माण झाला. त्याने विचारले, "पण तुझे वडील—?"

तिने सांगितले, "त्यांची काळजी करूं नका. चांगले घोरत पडले आहेत ते. आता सकाळपर्यंत त्याना जाग येणार नाही".

"मग धाडस करूच म्हणतेस ?" डॉक्टरने अधीरतेने विचारले.

"इश्श्य! हे काय मी सांगयला हवं?" माझी पूर्ण परवानगी आहे."

हे ऐकल्यावर डॉक्टर अगदी उत्सा-हाने पण जपून उठला. त्याने शिक्यावरचे जेवण खाली काढले आणि त्यावर यथेच्छ ताव मारला. कारण भुकेने व्याकुळ झालेल्या त्या डॉक्टरच्या मनात फक्त जेवणाचाच विचार होता. वाचक हो, त्या शेतकऱ्याच्या मुलीच्या मनात किंवा तुमच्या मनात ही कथा वाच-तांना कोणता बरे विचार येत होता?

# [३]

# "पलंग जागेवरच आहे"

तिसरी कथा आहे, ती खुद्द सम्राट नेपोलियनच्याच पलंगाची आहे! अजूनहि हा पलंग पॅरिस येथे नेपोलियनच्या अवशेषांच्या व स्मारकांच्या प्रदर्शनात पहावयास मिळतो. पण पन्नास वर्षांपूर्वी त्या पलंगावरून फ्रान्समध्ये प्रचंड वादळ झाल्याची—सत्य किंवा काल्पनिक—कथा 'लकुशे' या चित्रपटातील तिसऱ्या भागात सांगितली आहे.

त्यावेळी फ्रान्सच्या मंत्रिमंडळात एक रसिक मंत्री होते. त्यांची एक प्रेयसी होती. मोठी रंगेल आणि लावण्यवती. तिचे सारे लाड हे साहेब पुरवीत असत. पण एकदां मात्र तिने जो हट्ट धरला तो पूर्ण करणे त्यांना फारच कठिण झाले. त्यांना आपण पियर म्हणू आणि तिला जिन म्हणू. त्यांनी तिची समजूत काढ-ण्याचा प्रयत्न केला, "अग, नेपोलियनचा पलंग प्रदर्शनात आहे. तिथं रोज हजारो लोक येतात. तिथं पोलिस पहारा असतो. अशा परिस्थितीत तो पलंग आणून तुझ्या महालात कसा ठेवता येईल? मी असं करतो, की त्यापेक्षांहि सुंदर आणि मूल्यवान पलंग तुझ्यासाठी खास तयार करून घेतो. मग तर झालं?"

पण ती दुसरं काहीच ऐकून घ्यायला तयार नाही. ती म्हणाली, "तुम्ही एवढे माझे सावकार. सरकार दरबार त तुमचं वजन. आणि तुम्हाला माझ्यासाठी एवढं करता येत नाही म्हणजे काय? मला दुसरा कोणताहि पलंग नको. खुद्द नेपोलियनचाच पलंग आणलात, तर मी तुम्हाला घरात घेईन. नाही तर पुन्हा माझ्या घरात पाय ठेवू नका."

आता मात्र पियर साहेबांच्या पुढे पेचप्रसंग उभा राहिला. प्रेयसी मोठी, की प्रतिष्ठा मोठी? पण त्यांच्या हुषार डोक्यात असा विचार आला, की या दोन्ही गोष्टी कां जमू नयेत ? जीनच्या समजुतीसाठी चार सहा दिवस नेपोलियनचा मंचक तिच्या महालात आणून ठेवावा आणि मग तो पुन्हा जागच्या जागी नेऊन परत ठेवावा असा त्यांनी बेत आखला. त्या दर-म्यानच्या काळात तेथील प्रदर्शनात जेथे नेपोलियचा पलंग होता, तेथे 'दुरुस्ती-साठी हे दालन आठ दिवस बंद राहील' असा फलक लावायचा निर्णय त्यांनी घेतला.

पियर साहेबांच्या हुकुमाप्रमाणे सारे काम बेमालूम झाले. प्रदर्शनात त्या दालनावर दुरुस्तीचा फलक लागला. रात्री दोन वाजता पलंग त्या जागेवरून जीनच्या खोलीत गेला आणि पियर साहेब व ती आनंदित झाली.

हा प्रसंग येथेच संपला असता, तर ही कथा सांगण्यात काही अर्थ नव्हता. सुदैवाने म्हणा किंवा दुर्दैवाने म्हणा, जीनच्या घरी एक मोलकरीण होती, ती फ्रान्सच्या पार्लमेंटच्या एका सभा-सदाची निकटची मैत्रीण होती. तिने दुसऱ्याच दिवशी त्या खासदाराला सांगि-तले, "अहो, आहात कुठे तुम्ही? आमच्या बाईसाहेब सध्या खुद्द नेपोलियनच्या पलंगावर झोपतात." तो खासदार थक्कच झाला. त्याने प्रदर्शनात जाऊन खात्री करून घेतली.

त्या दिवशी पार्लमेंटचे अधिवेशन भरल्यावर त्या खासदाराने सभापतींना

पहिलाच लक्ष्यवेधी प्रश्न विचारला, "या क्षणी नेपोलियनचा पलंग कोठे आहे, हे आम्हाला कळेल काय?"

पियर साहेब चांगलेच चपापले. त्यांनी लगबगीने उठून सरकारी सफाईने उत्तर दिले, "नेपोलियनचा पलंग प्रदर्शनात असतो, हे सन्मान्य सभासदांना माहितच असेल. तथापि या प्रश्नाबद्दल तात्काळ चौकशी करून दोन तासांत खुलासेवार उत्तर दिले जाईल."

आतां विरोधी पक्षांत कुजबुज सुरू झाली. कोणी म्हणाले, तो इतिहास प्रसिद्ध पलंग चोरीला गेला असेल. कोणी म्हणाले, मधल्या मध्ये त्याची विक्री झाली की काय? तो माहीतगार खासदार हलक्या आवाजात सांगत होता, "अहो तो पलंग एका सुंदर स्त्रीच्या महालात आहे." पण त्याच्यावर विश्वास ठेवायला कोणी तयार नव्हते. पलंगाची काहीतरी भानगड झाली असावी असा संशय मात्र सर्वांच्याच मनात बळावला.

पण मंत्री पियर हे काही कच्च्या गुरूचे चेले नव्हते. त्यांनी गुप्त पोलिसांना त्या पलंगाचा पत्ता दिला आणि असेल त्या परिस्थितीत तो तावडतोब तेथून हलवून प्रदर्शनात नेहमीच्या जागी ठेवण्यास बजावले. मग त्यांनी सभापतीना सांगितले, "नेपोलियनच्या पलंगाची परिस्थिति चिंताजनक नाही. ज्या शंकाखोर सभासदांना तो पहायचा आहे, त्यांना तेथे नेण्यासाठी सरकारी वाहनांची व्यवस्था मी करीत आहे."

इकडे जीनबाई भरगच्च जेवण करून आणि जवळ जवळ सर्व कपडे काढून पलंगावर खुशाल लोळत पडली होती. साध्या वेषांतील पोलिसांनी घंटा वाजविण्याचे सौजन्य न दाखविता सरळ कुऱ्हाडींनी दारे मोडली आणि जीनबाई अर्धनग्न अवस्थेत पहुडली असतानाच तिच्यासकट पलंग उचलला. अंगावर चादर घेऊन ती "अहो माझा पलंग! कुठे नेता मला? अहो काय चाललंय्?" असा हाहाःकार करू लागली. पण तिकडे या प्रश्नावर सरकार कोसळण्याची भीति निर्माण झाली होती. त्यामुळे तिच्या ओरडण्याकडे कोणीहि लक्ष दिले नाही. मात्र प्रदर्शनाच्या मागच्या दारी बंद व्हॅनमधून पलंग बाहेर काढताना जीन व्हॅनमध्ये राहिली आणि अंगाभोंवती चादर गुंडाळून घाबरून ओरडून तिने आपल्याला घरी पोचवण्याची विनंति केली. ती अर्थातच मान्य झाली.

नेपोलियनचा पलंग मूळच्या जागी ठेवला गेल्याचा खुणेचा संदेश मिळताच पियरसाहेब पार्लमेंटमध्यें गंभीरपणे उभे राहून म्हणाले, "या प्रश्नाच्या चौकशी-साठी मी दोन तास मागून घेतले होते. प्रश्न विचारल्याला आतां फक्त पन्नास मिनिटेच झाली असूनहि मी त्याचे समाधानकारक उत्तर द्यायला सिद्ध आहे. या पलंगाच्या दालनाची दुरुस्ती चालल्याने हे दालन दोन दिवस बंद होते. पण आता ते खुले झाले असून पलंग पूर्वीच्याच जागी सुखरूप आहे. ज्या कोणा सन्मान्य सभासदांना त्याची पाहणी करायची असेल, त्यांना नेण्यासाठी बाहेर सरकारी वाहने तयार आहेत."

या खुलाशाने सर्वांचेच समाधान झाले. आपल्याला चुकीची माहिती देणाऱ्या मोलकरणीला विरोधी पक्षाच्या त्या खासदाराने मनांतल्या मनांत लाखोली वाहिली आणि अशा असंभाव्य गोष्टीवर आपण असा मूर्खासारखा विश्वास कसा ठेवला याचे आश्चर्य करीत त्याने सभागृहांतून पलायन केले.

त्यानंतर जीननेहि पुन्हा कधी नेपोलियनच्या पलंगाचा हट्ट धरला नाही आणि पियरसाहेबांनी तो हट्ट पुरविण्याचाहि प्रयत्न केला नाही. ●●●







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका

# लाँग यू

## आणि (पुस्तकातली झाली तरी)

# एक बाई

**पुस्तकातला किडा पुस्तकातच मरायचा (असं आपण समजतो व म्हणतोही) पण लांग यूला मात्र पुस्तकांतच 'सर्वस्व' गवसले.**

— वसंत फेणे



तोंडात पुस्तकाचे पान धरूनच लांग यू-चू याचा जन्म झाला. कारण त्याच्या वाड-वडलांनी ग्रंथ हेच धन मानले; ग्रंथ हेच वैभव मानले. आणि जेव्हा लांगचा जन्म झाला तेव्हा याच 'वैभवा'ने त्यांचे घर ठासून भरलेले होते.

यामुळे लांग पुस्तकातच रांगला, पुस्तकातच लोळला, पुस्तकातच खेळला, पुस्तकातच वाढला अन् पुस्तकातच रंगला. इतका की त्याला पुस्तकाशिवाय इतर गोष्टींचे भान राहिले नाही.

लांगच्या वडिलांनी 'ग्रंथ हेच गुरू' नांवाचा निबंध लिहिला होता. तो लांगने मुखोद्गत केला होता. आणि त्यानी लिहिलेला अभंग त्याने आपल्या टेबलावर भितीतच कोरला होता. त्यामुळे नेहमी त्याच्या दृष्टीसमोर

**'ग्रंथ हेच धन । ग्रंथ हेच धान्य**
**सर्वस्व निधान । ग्रंथ गुरु'**

हा अभंग तरळत असे.

लांगचे ग्रंथावरील प्रेम व निष्ठा त्याच्या सर्व वापजाद्यांच्याहि सवाई ठरली होती. तो दिवसरात्र ग्रंथ गुरुंच्या सान्निध्यातच असे. ग्रंथ घ्यावेत आणि त्यांचे मोठ्याने आणि मन:पूर्वक वाचन करावे हाच लांगचा एकमेव उद्योग. कुणी मित्र असे त्याला नव्हतेच. आप्त स्वकीय कुणी त्याच्याकडे आले की एखाद दुसरा शब्द वोलून तो आपल्या खड्या आवाजात वाचनाला सुरवात करी ! येणारे विचारे कंटाळून निघून जात.

करता करता लांग (गद्ये) पंचविशीत शिरला. पण गाढवपणा त्याच्या जवळ-पासहि फिरकला नाही. लग्ना बिग्नाचा विचार करावयास त्याला सवडच नव्हती.







अनुक्रमणिका

मात्र त्याला वाटे की पुस्तकातूनच एखादी स्वर्गीय रमणी प्रकटेल. नाही तरी म्हटलेच आहे 'सर्वस्व निधान ग्रंथगुरु !'

त्याला असे वाटावयासहि तसेच कारण होते. एकादा लांग खिडकीपाशी वाचत बसला असता जोराचा वारा आला. त्याबरोबर त्या जुन्या पुस्तकातली एकदोन पाने उडाली. खिडकीबाहेर गेली. वाऱ्याबरोबर दूरवर जाऊ लागली. लांगने धांव घेतली. उडणाऱ्या वाऱ्याबरोबर पुस्तकाच्या पानामागे तो लागला. ते पान एका खोलगट खड्डयात जाऊन विसावले. लांग धापा टाकीत टाकीत तेथे पोचला. तो खड्डयात उतरला. त्याने पुस्तकाचे पान उचलले. आणि काय आश्चर्य–तेथे धान्याने भरलेला एक मातीचा हंडा त्याला अर्धाअधिक पुरलेला आढळला. लांगचे डोळे चमकले. त्याच्या तोंडून आपोआपच शब्द बाहेर पडले 'ग्रंथ हेच धान्य !' हा धान्याचा साठा त्याला ग्रंथामुळेच आला होता ना ? अर्थात् ते धान्य घरी आणल्यावर खावयास निरूपयोगी आढळले ही गोष्ट वेगळी.

त्याच प्रमाणे एके दिवशी पुस्तकांच्या भल्या मोठ्या कपाटाला शिडी लावून तीवर तो चढला होता. एक जुने पुस्तक हुडकत होता. इतक्यात त्याला एक सोन्याचा छोटासा खेळण्यातील रथ तेथे आढळला !

'ग्रंथ हेची धन! ग्रंथ हेची धन!!' असें किंचाळतच तो सोन्याचा रथ घेऊन खाली उतरला! मात्र इतरेजनांनी अधिक परीक्षा केल्यावर ते सोनेरी मुलामा दिलेले जस्ताचे खेळणे ठरले !

परंतु लांगची ग्रंथावरील निष्ठा यत्‌किंचित्‌हि कमी झाली नाही. आपल्याला मिळणारी प्रियसखी पुस्तकातूनच अवतरेल याबद्दल त्याची खात्री होती.

सरकारी परीक्षात लांग पहिला क्रमांक सहज पटकावेल असे सर्वांना वाटे. परंतु काय असेल ते असो, लांगचे नांव उत्तीर्ण उमेदवारांच्या यादीत कधी झळकावयाचे नाही. याचे त्याला वाईटहि वाटत नसे. प्रत्येक परीक्षेनंतर तो आपल्या पहिल्याच उत्साहाने पुस्तकांचे वाचन खड्या आवाजाने सुरू करी. याचा घसा कसा बसत नाही अन् तोंड कसे दुखत नाही याचे आश्चर्य इतरांना वाटे. त्याला नाही. कारण वाचनापुढे अशी आश्चर्ये करीत बसावयास त्याला वेळच नसायचा.

लांगने तिशी गांठली. पण तो ब्रह्मचारीच होता. लोकांना वाटायचे हा विद्वान् पुढे मागे सभांचा अध्यक्ष म्हणून व्यासपीठावर चढेल, विद्यापीठाच्या पीठावर चढेल, पण याचे बोहल्यावर चढायचे राहूनच जाईल ! म्हणून ते लांगला लग्न करावयाचा उपदेश करीत. पण लांग त्यांना मूर्खात काढल्यासारखा (कुठल्याहि विद्वानाप्रमाणे) हंमून म्हणे, 'माझी स्वर्गीय सुंदरी पुस्तकातच आहे. ती असताना मी दुसरीशी लग्न करूच कशाला ?'

'विद्वान आहे झालं' म्हणून लोक गप्प बसत. त्यापैकी काही जण त्याची तोंडावर चेष्टाहि करीत. म्हणत, 'काल आकाशातून उल्कापात होताना आम्ही पाहिला. ती तुमची स्वर्गीय सुंदरी तर नसावी ना ? तुमच्यासाठीच तिने स्वर्ग सोडलेला दिसतो.' परंतु लांगची निष्ठा अढळ होती. 'सर्वस्व निधान ग्रंथ गुरू!'

एके दिवशी तो 'हान–ग्रंथा'चा आठवा खंड घेऊन वाचत होता. तीत एक सुंदर स्त्रीचे चित्र होते. 'हीच–हीच ती माझी स्वर्गीय सुंदरी. माझी प्रिय सखी' तो चित्र पाहून अनावरपणे बोलला. त्याने पान उलटून चित्राचे नांव पाहिले. 'येन-रू' (स्वर्गीय–सुंदरी) लांग केवळ चकित चकिता दृष्टीने तिच्याकडे पाहू लागला. लांग तहान भूक विसरला. त्या स्वर्गीय सुंदरीपायी वेडा झाला. ते चित्र समोर ठेवून तो तास तास-तासतास बसू लागला.

काही दिवसानंतरची गोष्ट. टेबलावर तो ग्रंथराज उभा ठेवून त्यातील स्वर्गीय सुंदरीच्या चित्राचे पान उघडून लांग बसला होता. एकाग्र चित्ताने तिच्याकडे पहात होता. अन् एकाएकी चित्रातली 'स्वर्गीय–सुंदरी' पुढे झुकली. लांगचा रोमरोम ताठ झाला. क्षणभर त्याला काय करावे ते सुचेना. जराशाने तो भानावर आला. त्याने पुढे झुकलेल्या सुंदरीला पाहिले. आणि त्याने मान वाकवून गुडगे टेकून अभिवादन केले. व तो फिरून उभा राहिला. आणि त्याच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही ! ती स्वर्गीय सुंदरी फूटभर उंचीच्या बाहुली एवढी होऊन त्या पुस्तकावरच बसली होती ! लांगच्या शरीराचा अणूरेणू आश्चर्याने थरारला. त्याने फिरून तिला पहिल्यासारखे अभिवादन केले अन् तो उभा राहिला. अन् त्याने पाहिले, ती प्रमाणबद्ध अवयवांची लावण्यखनी टेबलावरून खाली उतरत होती आणि पुस्तकातील चित्राच्या जागी चौकट मोकळी होती !

'देवी–देवी जी, आपलं नांव–' भांबावलेल्या लांगने विचारले.

'मी काही देवी नाही कोणी' गोड आवाजांत व किंचित् मिष्कील स्वरात ती म्हणाली, 'माझं नांव येन–रू'.

'येन–रू? स्वर्गीय सुंदरी? खरंच किती —किती सुंदर दिसतेस तूं–खरं म्हणजे



**'पोकळी'**

**पोकळ अंग तुझं, पोकळ पोकळ मन;**
**पोकळांतली पोकळ तूं**
**पोकळ पोकळ माझ्यासाठीं**
**बघताना किती डोळे पोकळ तुझे**
**देताना पोक (क्त)—पोकळ ओठ;**
**बाहू गळ्यांत पोकळ पोकळ,**
**पोकळ ऊर**
**पोकळाच तूं, पोक्त – कलावंती**
**पोकळ पोकळ पोकळपारी**

—ह. वि. खरात









अनुक्रमणिका

माझा विश्वासच बसत नाही—'

'कां वरं? तुम्ही मला ओळखता चांगलं. रोज मला पाहता. मी तुमच्यापाशी येणार असा विश्वास बाळगता. तुमच्या सारखा माझ्यावर विश्वास ठेवणारा दुसरा कुणी आढळला नाही नि आँढळायचाहि नाही!'

लांगला पराकाष्ठेचा आनंद झाला होता. त्याला काय करावे ते सुचत नव्हते. काही वेळाने सुंदरी खाली मान घालून पायाच्या अंगठ्याने जमीन उकरल्या-सारखं करीत म्हणाली; 'आतां आपण निजूया ?'

'हो' लांग आनंदाने म्हणाला. तिचा शब्द झेलायला त्याचा जीव कमालीचा आतूर झाला होता.

तिने विछाना नीट केला आणि ती तिथेच उभी राहिली. लांगला तिचे कौतुक वाटले. तो पलंगावर आडवा झाला. तिला म्हणाला 'तूंहि झोप आता' अन् काही क्षणातच तो घोरू लागला!

येन–रूने कपाळाला हात लावला. अन् ती स्वतःशीच हंसली. अगदी विमनस्क-पणे. आणि ती त्याच्याकडे पाठ करून झोपली !

दुसरे दिवसापासून लांग सुंदरीला क्षणभरहि विसंबीना. नेहमी तिला जवळ घेऊन असायचा. परंतु तरीहि हातांत एखादा ग्रंथराज आणि त्याचे खड्या सुरात वाचन. सुंदरी त्याला म्हणायची, "पुरे झालं तुमचं वाचन. मी जवळ आहे याचं भान तरी आहे का? एक स्वर्गीची लावण्यखनी तुमच्याजवळ – तुम्हाला अशी बिलगून बसते अन्— " लांग अधिकच मोठ्याने वाचायला सुरवात करी.

कधी ती म्हणायची, "तुम्ही असे सारखे वाचत असता ना म्हणूनच तुम्ही मागे पडता. सरकारी परीक्षा उत्तीर्ण होऊन मोठमोठ्या पदावर पोचलेल्या पैकी कुणी इतकं वाचन केलं तरी आहे का ?"

अखेर ती कंटाळली. म्हणाली, "हे बघा, आता शेवटचं सांगून ठेवते. तुम्ही वाचन सोडलं नाही तर मीच तुम्हाला सोडीन."

ही मात्रा बरोबर लागू पडली. "सोडली, – पुस्तकं वाचायची सोडली. तुझी शप्पत. !" लांग काकुळतीनं म्हणाला.

आणि आश्चर्य म्हणजे काही दिवस पुस्तकं वाचल्याशिवाय तो राहिला.

परंतु एके दिवशी वाचनाची त्याला इतकी काही विलक्षण तलफ आली कीं काय घडतं हे त्याचं त्याला समजायच्या आतच तो एक पुस्तक घेऊन धडधडा वाचायला लागला. वाचता वाचता त्याला जाणवलं येन–रू जवळपास नाही. त्याने इकडे तिकडे पाहिलं. आतल्या खोलीत पाहिलं, बाहेरच्या दालनात पाहिलं. ती कुठंच नव्हती. त्याने हांका मारल्या; पण त्याला उत्तर मिळाले नाही. एकाएकी त्याला आठवले. तो पुस्तकांच्या शेल्फपाशी गेला. 'हान–ग्रंथा'चा आठवा खंड त्याने काढला. तिचे चित्र असलेले पान उघडले–आणि तिथे ती होती. चित्ररूपाने.

लांगने तिला परोपरीने विनवले. पण ती ठिम्म हलायला तयार नव्हती. "येन–रू–! येन–रू मला क्षमा कर" लांग रडकुंडीला येऊन बोलला. येन रू ला त्याची दया आली. ती पुस्तकातून उत-रली. चित्राची चौकट रिकामी दिसू लागली. "हे पहा, आता मी येते; परंतु पुन्हा कधी म्हणून माझं ऐकलं नाही न –तर मी पुस्तकात जावून बसेन. कध्धी म्हणून परत येणार नाही." येन रू म्हणाली.

येन–रूने मग बुद्धिबळाचा पट आण-वला. लांग बरोबर ती बुद्धिबळे खेळू लागली. पण लांगची प्यादी काय, हत्ती घोडे काय, वजीर सुलतान काय, पटपटा पटपटा मरायचे. पटकीचा रोग झाल्या-सारखे. लांगचे मन त्या खेळात कधी रमलेच नाही.

ती, जवळपास नसल्याचं पाहून लांग चोरून पुस्तक वाचायचा. तिला समजू नये म्हणून अगदी हलक्या आवाजात वाचन करायचा. शिवाय त्याने आणखीन् एक युक्ति केली. तिने पळून जाऊ नये म्हणून त्याने 'हान–ग्रंथा'चा आठवा खंड एका कोपऱ्यात पुस्तकाच्या ढिगाऱ्यात लपवून ठेवला. अन् 'हिला अवदसा आठवली तर पळून जायला' नको असं मनात म्हणाला.

एकदा असाच लांग चोरून पुस्तक वाचत होता. अगदी खर्जात. एक पान त्याने वाचले. परंतु तेच पान त्याला चढले. आणि तो सारं काही विसरून खड्या सुरात वाचू लागला. येन–रू तेथे आली. त्याच्यासमोर उभी राहिली. लांगची नजर तिच्यावर पडली. त्याने घाईघाईने पुस्तक मिटले आणि कपाटात ठेवून दिले. तो परत वळला तेव्हा येन–रू तेथे नव्हती. खूप शोध केल्यावर त्याला ती 'हान–ग्रंथा'–च्या आठव्या खंडात पूर्ववत् दिसली.

लांगने खूप विनवण्या केल्यावर ती परत आली. पण त्याला तिने एक अट घातली. अट अशी कीं तीन दिवसांत बुद्धिबळात त्याने प्रगति दाखवावयास हवी. लांगने ती कबूल केली. तीन दिवस तो तिच्याबरोबर शेकडो डाव (हरत) खेळला. तिसऱ्या दिवशी सायंकाळी लांगने तिची सबंध दोन प्यादी गारद केली. लांगला मैदान गाजवल्याचा आनंद झाला. आणि येन–रू अत्यंत प्रसन्न झाली.

त्याची एवढी प्रगती झालेली पाहून तिने त्याला दुसरी अट घातली. ती म्हणजे पांच दिवसात त्याने सतारीवर पहिले दोन बोल काढून दाखवायचे. ही शेवट-चीच अट हे तिच्याकडून कबूल करून घेतल्यावर लांगने तिची दुसरी अट मान्य केली. पांच दिवसात त्याने चार सतारींची वाट लावली. आणि पांचव्या [illegible]

## महत्त्वाची सूचना

ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपया गेल्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.

— व्यवस्थापक








अनुक्रमणिका

पांचव्या सतारीतून 'दिड–दा' बोल काढले.

येन–रू खूश झाली आणि म्हणाली, "आता तुम्ही माणसात आलात. आता तुम्ही सरकारी परीक्षा पास होऊन मोठे अधिकारी व्हाल."

या सर्व धांदलीत लांग आपले वाचनाचे वेड विसरला. येन–रू त्याला दिवसेंदिवस अधिकाधिकच सुंदर दिसू लागली.

एका रात्री तो येन रू ला म्हणाला, "काय ग ए रू, नेहमी एक पुरुष आणि एक बाई एकत्र राहू लागली की काही महिन्यानी त्यांना मूल होतं. आपल्याला कसं ग झालं नाही अजून मूल? किती गोजिरवाणं दिसतं लहान मूल, नाही?"

येन–रू त्याला हंसली आणि म्हणाली, "पुस्तकं वाचा पुस्तकं! तरी किती वेळां सांगत होते मी, पुस्तकात काही अर्थ नसतो. ती वाचणं म्हणजे वेळ वाया दवडणं. आता पहा पुस्तकातील 'पति-पत्नी' या प्रकरणावद्दल तुम्हाला काहीच समजत नाही. पति–पत्नीचं जीवन ही एक नाजूक कला आहे समजलात?"

"कसली कला?" लांगने कुतूहलाने विचारले. ती हंसली. क्षणार्धांच लाजली. आणि संकोचून उभी राहिली.

पण लांगने तिचा पिच्छाच पुरविला. शेवटी तिने त्याच्या ज्ञानात भर घातली. आणि स्वर्गीय सुखाच्या क्षणी तो म्हणाला, "वैवाहिक जीवनात याप्रकारचं– जे कोणत्याहि शव्दांनी वर्णन करता येणार नाही असं सुख असतं असं कधी वाटलं नाही."

दुसरे दिवशी तो जो मिळेल त्याला या दिव्य अनुभवाविषयी, "काल रात्री वघ–" अशी सुरुवात करून सांगू लागला. सारे त्याची टिंगल टवाळी करू लागले. येन–रूच्या कानावर ही हकीकत जाताच तिने त्याला आत वोलावून आणले. ती त्याला रागावून वोलली, "असलं गुपित काय बाहेर वोलायचं असतं?"

"पण गुपित म्हणून नाही–कित्ती मज्जा असते म्हणून तर——"

"पण ती चार चौघात सांगायची नसते हो" ती रंजीस येऊन म्हणाली.

"पण कां म्हणून?"

"तुम्हालाच ती माहित आहे असे नाही; साऱ्यानाच माहित आहे. मग सगळीकडे असं सांगत सुटण्यात——"

"सगळ्यांना माहित आहे तर, ती गुपितं कशी? मग सगळ्यांशी वोलण्यात काय हरकत आहे?" लांगने तिलाच प्रश्न केला.

शेवटी तिनेच मुत्सद्दीपणा करून म्हटलं, "इतरांशी वोलल्यास त्यातली सगळी मज्जा जाते. हे सांगून ठेवते"

हे मात्र लांगला पटले.

वर्षाभराने येन–रूला एक सुंदर मुलगा झाला. त्यानंतर एके दिवशी ती लांगला म्हणाली, "मी दोन वर्षे तुमच्या वरोवर राहिले. माझ्यापासून तुम्हाला मुलगाहि झाला आता मी परत जाते. अधिक काळ राहिले तर निश्चितच काही संकट येईल अशी भीति वाटते मला ."

"जाऊं दे ग. आलं संकट तर आलं. तूं गेलीस तर सारी मज्जाच जाईल. त्याहून मोठं संकट कोणतं असूं शकेल?"

"राहते मग मी" येन रू म्हणाली, "पण आधीच सूचना देऊन ठेवते आपली."

हा वेळ पावेतो गावात कुणकुण पसरली होती. लांग यू चूने धर्मच सोडलाय्. कुणी एक वाई ठेवून तो राहतो. लग्न विग्न काही केलं नाही तिच्याशी; वाडवडलांच्या कीर्तीला वट्टा लावतो. कुलदीपक निघाला खरा. अशी त्याच्याविषयी चर्चा चाले. वाई म्हणे अगदी लावण्यखनी आहे. या वावळटाच्या हाती ते रत्न सांपडलय्. क्वचितच कुणाच्या नजरेस ती पडते असे येन–रू बद्दल वोलले जाई. लोक लांगवर जळू लागले. त्यांनी सरकारांत तक्रार केली. त्या जिल्ह्याचा न्यायाधीश शी हा होता. शीच्या कानावर जेव्हा येन–रूच्या सौंदर्याची कीर्ति गेली; तेव्हा त्यालाहि वाटले, लांगला शासन केलेच पाहिजे.

झाले. सरकारी हुकूम सुटले. लांगला कैद करून शी पुढे हजर करण्यात आले. येन–रूलाहि पडकण्याची आज्ञा होती. पण घरात तिचा मागमूसहि नव्हता. ती लावण्यखनी हाती लागली नाही हे समजताच शी खवळला. त्याने लांगला तुरुंगात टाकले. तिचा ठाव ठिकाणा मिळविण्यासाठी लांगला यथेच्छ वदडण्यात आले. खरे कुणाला पटले नसते. खोटे तरी काय सांगणार? लांग आपला मार खात राहिला.

लांगच्या घरच्या म्हाताऱ्या मोलकरणीला या वावतीत छेडण्यात आले. तरीहि काही उपयोग झाला नाही. घरभर भरलेली त्याची पुस्तके वाहेर काढण्यात आली. तरी येन–रूचा पत्ता लागला नाही. शीने त्याच्या ग्रंथ संग्रहाला आग लावण्याची आज्ञा दिली. लांगचा ग्रंथसंभार दोन दिवस सारखा जळत होता. त्याचे एकूण एक पुस्तक जळून खाक झाले.

तुरुंगातून सुटल्यावर लांग सरकारी परीक्षेला वसला. तो ती उत्तम रीतीने उत्तीर्ण झाला. त्याला मोठ्या हुद्याची जागा मिळाली.

त्याने एक पाचूचा खडा आणवला. त्याची सकाळ सायंकाळ तो पूजा करू लागला, "येन–रू तुझ्यात जर खरोखरच दैवी शक्ति असेल तर शीच्या जिल्ह्यावर तपासणीसाठी माझी नेमणूक होईल असे कर!" रोज पूजा केल्यावर तो पाचूच्या खड्यापुढे हात जोडून म्हणावयाचा.

आणि खरोखरच काही आठवड्यातच त्याला शी होता त्या जिल्ह्यात सरकारी कामाच्या तपासणीसाठी पाठविण्यात आले !

लांग तेथे गेला. शीने तेथे बरीच लांचलुचपत केल्याचे त्याला आढळले. त्याने सर्व चौकशी केली. शी ची सर्व इस्टेट सरकारजमा केली आणि शीला भणंग करून रस्त्यावर सोडले.

शीची एक अत्यंत आवडीची अशी रूपगर्विता होती. ती दुसऱ्या एक सरकारी अधिकाऱ्याने आपल्या ताब्यात ठेवली. लांगने त्याला वोलावले. पैशाने त्याची मूठ दाबली. आणि ती वाई आपणाकडे घेतली.

शी प्रकरण संपले. लांगने तावडतोब नोकरीचा राजिनामा दिला आणि त्या रूपगर्वितेला वरोवर घेऊन तडक आपल्या गांवी निघाला.

तो खरोखरच आता ज्ञानी झाला होता. • • •

(P'u Ling Sung या चिनी लेखकाच्या The Crazy Book Worm या कथेचा स्वैर अनुवाद)

इक्कू जिपेन्‌शा (IKKU JIPPENSHA) (१७६५-१८३१) या प्रसिद्ध जपानी लेखकाने लिहिलेल्या 'हिझाकुरीज' (Hizakurige) या जपानी भाषेतील सुप्रसिद्ध विनोदी कादंबरीतील हे एक प्रकरण आहे. ही कादंबरी प्रवासवर्णनपर आहे. व तिच्यात खूप गंमती जंमती व उच्छृंखल विनोदी घटना आहेत. हिला कादंबरी म्हटले आहे केवळ तिच्या लांबीमुळे असे वाटते. नाहीतर एरवी तिचे कोणतेंहि प्रकरण सुटे घेतले तरी ती एक स्वतंत्र विनोदी लघुकथा होऊ शकते. तशीच ही एक 'कथा' आहे–जपानी वाङ्मयांतील विनोदाची यथार्थ कल्पना देणारी व मनोरंजन करणारी.




**सुप्रसिद्ध** तोतोमी सागर शांत होता आणि वारा पडला होता. वातावरण भरपूर आनंद लुटण्यासारखं होतं. **याजीरोबी** आणि **किताहाची, ओई** नदी ओलांडता न आल्यामुळे **ओकाबे** या ठिकाणी वस्तीला राहिले होते.

सरकारी टपाल निघून गेलं आणि रस्ता मोकळा झाला हे कानावर आल्यावर ते दोघे बाहेर पडले. रस्ता कापीत **आसाहीना** नदीवर आले. नंतर ती ओलांडून, **याहातोनी** बेटाजवळून, ते **शिरोकोला** पोहोचले. इथे, रस्त्याच्या दोन्ही बाजूला, चहाघरातील मुली ओरडत होत्या, "आंत या आणि टेका. मुशाफिरांसाठी करमणुकीची चांगली सोय. आंत पाऊल टाका."

"धन्यांनो, तुम्हाला घोडा नको काय ?" घोडेवाल्या पोऱ्या म्हणाला, "दोनशे तांब्याच्या नाण्याला अगदी स्वस्त दरात मी तुम्हाला घेऊन जाईन–म्हणजे काहीच नाही. सद्‌गृहस्थ हो...."

"मी दोनशे तांब्याच्या नाण्यात दुसऱ्या घोड्यावरून जाईन... येरड्या.....शेणखाद्र्या..." किटा म्हणाला.

"शेणखाद्र्या कुणाला म्हणतोस ?" त्या हाक्यापोऱ्याने विचारलं "मी कधी खाल्लं होतं रे शेण?"

"हीं..हीं.." घोडा खिकाळला.

"थोडं मद्य पिऊंया" **याजी** म्हणाला. "ये, पोरी, तुझ्याजवळ चांगली साकी असली तर एक घोट आम्हाला दे. ते चहाघरात शिरले आणि ती मुलगी त्यांची सेवा करू लागली.

"तुमच्यासाठी मी **साकी** गरम करू काय ?"

"हो तर..." याजी म्हणाला. आणि तुझ्याजवळ खायला काय आहे ?"

"तळलेले मासे आणि कांदे..." चहाघराचा मालक म्हणाला.

"काय ? तळलेले कांदे ?" किटाने विचारलं. " छान !"

त्या मालकाने साकीची बाटली, पेले आणि थाळीतून मासे आणले.

किटाने एक घास घेतला. "हॅलोआ, हा मासा कुबट आहे. हा काल शिजवलेला आहे."

"छे छे," तो मालक म्हणाला, "तो कालचा नव्हे."

'अच्छा, आमच्या घशाखाली तो उतरत नाही.' याजी म्हणाला.

"कालचा जर वाईट आहे," तो मालक म्हणाला, 'मी तुम्हाला थोडासा परवाचा देईन. मी पैजेवर सांगतो की तुम्हीं झिंगून जाल.'

"झिंगून ?" किटाने विचारले, 'अरेच्या, ही साकी म्हणजे अर्धं पाणी आहे.' त्याने ती थुंकून टाकली. "काय किंमत हिची ?"

"माशाला चौवेचाळीस तांब्याची नाणी, आणि पेयाची अठ्ठावीस नाणी."

"छान ! इतकं महाग !" किटा उद्गारला, "चल निघूया."

त्यानी जेवणाचे पैसे दिले आणि निघाले. लवकरच ते **फुजिदाला** आले. त्या शहराच्या प्रवेशद्वारावरच त्याना एक म्हातारा माणूस भेटला. त्याच्या पाठीवर एक गाठोडं होतं आणि एका अवखळ घोड्यावर बसून तो चालला होता. तेवढ्यात घोडा येऊन किटावर आदळला. तो घरंगळत एका डबक्यात पडला. किटा भयंकर रागावला आणि उडी मारून त्याने त्या म्हाताऱ्याची मानगुट पकडली.

"ये थेरड्या, तुला डोळे नाहीत काय ?" तो ओरडला.

म्हातारा म्हणाला, 'मला फार वाईट वाटतं.'

'वाईट वाटून उपयोग नाही. थंड पाण्याची आंघोळ करण्यात माझा जन्म गेला.'

"छान, तुला थंड पाण्याने आंघोळ करण्याची संवय असेल, तर ते बरंच आहे." तो म्हातारा म्हणाला, 'तूं मघा पडलास ते पाणी नव्हतं; ते घोड्याचं मलमूत्र होते.'

किटा किंचाळला. 'घोड्याचे मलमूत्र ? त्यात मला कां ढकललंस ?'

"घोड्याने लाथाळी सुरू केली, आणि दुर्दैवाने तूं त्यांत सापडलास. काही करतां येण्यासारखं नव्हतं. तूं मला क्षमा कर."

'तुला आणि क्षमा ?' किटा भडकला. 'कधीच करणार नाही. तुझा उद्धटपणा मी चालू देणार नाही. तुझं डोसकंच फोडतो."

'अरे, अरे ! तुला काही डोकं आहे की नाही ? उगीच जास्त बोलू नकोस'.

'निघून जा, थेरड्या.' किटा ओरडला. तो त्या म्हाताऱ्याच्या अंगावर हात टाकणार होता इतक्यात याजी मध्ये पडला.

'किटा, तूं त्याला क्षमा कर,' तो सांगू लागला. 'आणि, तुम्ही हो, तुम्ही सुद्धा इतका हट्टीपणा करता कामा नय. दोष तुमचा आहे. निघा. अधिक वटवट करू नका.' याजी किटाची समजूत घालू लागला. तो म्हातारा निघून गेला.

ते पुढे निघाले. त्यानी **सेटो** नदी ओलांडली. एका चहाघराच्या अंगणात तो म्हातारा विश्रांति घेत असलेला त्याना दिसला. त्याना पाहिल्यावर लगेच "इकडे या." असं तो ओरडला. 'आत्ता मी तुमच्याशी उद्धटपणे वागलो. मला क्षमा करा. जरा मी जादा घेतली होती आणि मला वाटतं मी थोडासा मूर्खासारखा बोललो असेन. पण मला क्षमा करा. निरोप घेण्यापूर्वी थोडं मद्य घेऊ या. तुम्हाला काय वाटतं ?"

"आम्ही अगोदरच प्यालो आहोत." याजी म्हणाला.

'माझ्याबरोबर तुम्ही एक पेला तरी घेतलाच पाहिजे. अहो, मालक, उत्तमपैकी साकी घेऊन या बरं.'

'आभार. . .' किटा म्हणाला, पण आम्हाला थांबता येणार नाहीं. चल निघूया.' याजी.

'तुम्ही इतके उतावीळ आहात ! क्षणभर तरी आत याना.'

म्हाताऱ्याने त्यांना आत खेचून नेले. साकी मिळणार म्हणून अगोदरच तोंडाला पाणी सुटलं होतं, म्हणून त्यांनी प्रतिकार केला नाही.

'एक पेलाभरच घेऊया, किटा,' याजी म्हणाला, 'खरं म्हणजे या वडीलधाऱ्या माणसाला पैसे द्यायला लावायचे याची आपल्याला लाज वाटली पाहिजे.'

"मुळीच नाही, मुळीच नाही . ." म्हातारा म्हणाला, 'अहो, मालक, खूपसं खायला घेऊन या. चला, आपण मागील्दारच्या कुठच्यातरी- खोलीत जाऊ. . .'

'असं, इकडून' नोकराणी म्हणाली. तिने साकीची बाटली व पेले हातात घेतले आणि बगीचांतून त्यांना ती मागीलदारच्या एका खोलीत घेऊन गेली.

'अहो, वडील माणूस, पहिला प्याला तुमचा'. त्या म्हाताऱ्याला प्याला देत याजी म्हणाला.

'छान ! छान ! मी आता त्या तरुण माणसाला पेला देणार.'

'मला अगोदर कांहींतरी खायला पाहिजे.' किटा म्हणाला, 'मला भूक लागली आहे.'

'काय ?' म्हाताऱ्याने विचारलं. 'भूक ? मग तू थोडा भात खा. बरं वाटेल.'

'तरीही मी साकीचा पेला पिणारच.' किटा बोलला. "ओऽहो, फारच छानच! सूप कसलं आहे. आता तुला एक पेला देऊं दे.'

'नाही, नाही, मला तुझ्या पेल्यात ओतूं दे.' म्हातारा म्हणाला. 'ते आता काही तरी खायला आणतील. अग ए, नोकराणी, नोकराणी.... मी मागवलेले जिन्नस तूं अजून कां आणीत नाहीस ?'

'आले हं' ती म्हणाली.

शेवटी एकदाचं जेवण आलं.

'एकदाचं आलं बुवा.' म्हातारा म्हणाला. 'पण त्या पेटींत काय आहे ? अंडी ?'

'म्हणून तर त्यांना यायला इतका वेळ लागला.' याजी बोलला. अंडी घालून होईपर्यंत ते थांबले होते.'

'तर मग ती नक्कीच ताजी असणार.' किटाने भाष्य केलं, "उत्तमच !"

'कृपा करून पोटभर प्या.' म्हातारा म्हणाला. 'मघा मी काहीतरीच बोललो ?'

'छे, छे, मीच इतका चवताळून गेलो होतो.' किटा बोलला. 'मीच काही तरी तुम्हाला बोललो. मला क्षमा करा.'

'हा किती चांगल्या स्वभावाचा आहे.' याजी म्हणाला, 'नाहीतर हा भला गृहस्थ! खायला आणि प्यायला मिळालं की झालं. . .'








स्वयंपाकघरांतून सर्व प्रकारचे चांगले चांगले जिन्नस त्यांच्या समोर येऊन पडत होते. तो बिल देणार म्हणून दोघेही त्या म्हाताऱ्याला चढवत होते.

कांहीतरी कामाच्या निमित्ताने मध्येच तो म्हातारा माणूस बाहेर गेला.

'याजी,' किटा बोलू लागला, 'हे सारं माझ्यामुळे तुला मिळालं.

'चालता हो,' याजी म्हणाला, 'तुझ्या एकट्यामुळे नाही!' तो बाहेर गेला आहे तोपर्यंत आणखी एक पेलाभर झोकूया.'

'मी या चहाच्या पेल्यातून पिणार आहे.' किटा म्हणाला. मग तो गाणं गाऊ लागला. याजीनेही आपला सूर त्यात मिसळला.

'मजा आली. पण तो थेरडा गेला तरी कुठे?'

'बराच वेळ झाला. नाही?' किटाने विचारलं. 'एॅ नोकराणी, अशी इकडे ये; इथं म्हातारा होता तो, कुठं गेला?'

'तो बाहेर गेला' ती म्हणाली.

याजी उद्‌गारला. 'कशासाठीं? विचित्रच!'

म्हाताऱ्याची वाट पाहून ते कंटाळले. पण तो परतलाच नाही.

'अग ए, नोकराणी. . जाण्यापूर्वी त्या म्हाताऱ्याने पैसे दिले?'

'छे; पैसे दिलेले नाहीत. . .'

"ओ. . ओ. . ." याजी कण्हू लागला.

'तो मूर्ख थेरडा आमच्यावर डाव उलटवूं पहातो आहे.' किटा म्हणाला, 'मी त्याला शोधून काढतो. . .'

'परकी' विनोद—




'आँ, सुंदर आहे, काय आहे, ते?

एक उडी मारून तो झपाटयाने बाहेर पडला, पण ढगाचा पाठलाग करण्यासारखंच त्याला वाटलं. किटा वरचसं भटकून निराश होऊन परतला आणि याजीला म्हणाला, 'त्याने आम्हाला बनवलं.'

'काही इलाज नाही,' याजी म्हणाला, 'आपल्याला पैसे दिलेच पाहिजेत. त्या म्हाताऱ्या सैतानाने सूड घेतला खराच.'

'पण आपण कां म्हणून पैसे द्यायचे?' किटाने विचारलं. "छळ! आणि आत्ता नुक्ती कुठे मजा येत होती! आता ती चांगलीच उतरली!'

"किती पैसे द्यायचे?"

'आँ. . ए. . .' मालक म्हणाला, 'नऊशे पन्नास तांब्याची नाणी.'

'आमची फसवणूक झाली'. किटा बोलला.

'मोठा बनेल आणि हुशार होता म्हातारा,' याजी म्हणाला,

'ये. .! असा आपलाच कुणी डोळा आपल्याच हातावर काढून ठेवला की असा राग येतो. . .'

पण त्या म्हाताऱ्याला शिव्या घालता घालता सुद्धा त्या म्हाताऱ्यानं किती हुशारीनं सूड घेतला याचं त्याला हसूं येत होतं.

प्रवास करीत ते **ओई** नदीवर आले. **शिमाडाला** त्यांना एक नावाडी भेटला.

'तुम्हाला नदी ओलांडून जायचं आहे का?' त्याने विचारलं.

'आम्हा दोघांचं काय घेशील?'

'आज सकाळपासूनच नदीवरून जातां येत आहे,' तो म्हणाला. 'तुमचे दोघांचे ८०० तांब्याची नाणी इतके भाडे पडेल.'

'भलताच दर आहे!' याजी म्हणाला.

'तुम्ही किती द्याल?'

'याची तुला काळजी नको.' याजी उतरला.

'आम्ही आपण होऊन पलीकडे जाऊ.'

'छान. तुम्ही प्रवाहात वाहून गेलात व बुडालात तर देवस्थान तुम्हाला पुरायला फक्त दोनशे तांब्याची नाणी घेईल.' नावाडी म्हणाला, 'म्हणजे स्वस्तच तर नाही का? हा. . . हा. .!'

'मूर्ख कोठला!' याजी म्हणाला, 'मी आता तुझ्या धन्यालाच जाऊन सांगतो. जरा तुझा खंजीर दे. . . .'

'कां?' किटाने विचारलं.'

'मी **सामुराई** बनणार आहे.' याजी म्हणाला. त्याने किटाचा खंजीर घेतला आणि आपल्या कमरपट्ट्यात खोवला. त्यावरील म्यान त्याने खाली खेचलं. हेतु असा की, त्याने दोन तलवारी धारण केल्या आहेत असं दिसावं.

'आता बघ.' तो म्हणाला, 'मी आता सामुराईसारखा दिसतो की नाही?'

'आता थोडी गंमत करायची,' किटा म्हणाला. त्याने याजीचं गाठोडं घेतलं आणि आपल्या गाठोड्याला बांधलं. ते नाकेदाराच्या कचेरीत गेले.






अनुक्रमणिका

'तूच मुख्य नावाडी का ?' याजीने सामुराईसारखं बोलण्याचा वहाणा करीत विचारलं. 'माझ्या धन्यानं हुकूम केल्यावरुन मी एका मोठ्या महत्त्वाच्या कामाला निघालो आहे. जरा तुझ्या माणसांना मला पलिकडे न्यायला सांग.'

'नक्कीच महाराज' तो प्रमुख म्हणाला, 'तुमच्या तांड्यात किती लोक आहेत ?'

'ए...?' याजीनं विचारलं. 'माझा तांडा ?'

'होय, महाराज मेण्यातून प्रवास करीत आहात की घोड्यावरून ?' आपल्या बरोबर कितीसं सामान घेतलं आहे ?'

'तट्टू भरलेले तीन घोडे आहेत.' याजी सांगू लागला, 'हलकसं सामान घेतलेले पंधरा घोडे आहेत, परंतु ते हळू हळू चालू लागले म्हणून मी त्यांना एडो बाहेर ठेवून आलो आहे. त्याऐवजी मी मेण्यातून प्रवास करीत आहे.

'आणि तुमचा नोकरवर्ग ?'

'ते बाराजण आहेत,' याजी म्हणाला, 'शिवाय भालदार, वहाणा वहाणारे, माझ्या पेटचा आणि कुवड्या वहाणारे लोक बरोबर आहेतच.'

'एय्, ए..' प्रमुख उद्गारला. 'पण ते सेवक आहेत कुठे ?'

'असं होय...' याजी बोलला, 'मी एडोहून बाहेर पडलो तेव्हा ते सर्वजण माझ्याबरोबर होते, पण त्यांना मध्येच कांजण्या आल्या, म्हणून त्यांना मागेच ठेवून आलो. आता आम्ही दोघेजणच आहोत व आम्हाला नदी ओलांडून पलिकडे जायचं आहे. एका तराफ्याला काय पडेल ?'

'एका तराफ्याला चारशे ऐंशी तांब्याची नाणी पडतील.'

'जरा जास्तच आहे,' याजी म्हणाला. 'थोडं कमी होणार नाही ?'

'दरात आम्ही काही कमी करीत नाही'. तो मनुष्य उत्तरला. 'इथे मूर्खासारखे बोलत उभे राहण्यापेक्षा तुम्ही निघाल तर फार बरं होईल.'

'ए ?' याजीनं विचारलं. 'सामुराईला तूं असं म्हणतोस ?'

'हा..हा....हा....!' तो मनुष्य मोठमोठ्याने हसला 'छान दिसता सामुराई !'

'तू एका सरदाराचा अपमान करतोस ?" याजी ओरडला. 'अक्षम्य.'

'चांगलाच सरदार दिसतोस तू.' तो मनुष्य म्हणाला. 'तुझ्या तलवारीच्या टोकाकडे पहा ?'

याजीने वळून पाहिलं तेव्हां त्याच्या लक्षांत आलं की तो एका खांबाला टेकला होता. आणि ते फक्त म्यान असल्यामुळे तुटून त्याचे दोन तुकडे झाले होते. मग सगळेच जण हसू लागले. आणि याजी लाजेने चूरमूर झाला.

'मी मिनोया शिरोतोशीचा वंशज आहे.' याजी म्हणाला.' म्हणून मी तुटलेली तलवार वाळगतो.'

'आता अधिक अद्वातद्वा बोललास,' तो नावाडी प्रमुख म्हणाला. 'तर मी तुला बांधून ठेवीन.'

'काही उपयोग नाही, याजी,' किटा म्हणाला, 'ते निघाले चल निघूया.'

'हा...हा...हा !' नावाडी कुत्सितपणे हसला.

हे काही जमलं नाही.' याजी कुरकुरला. 'छळ !'

ते नदीतीरावर आले. तर अगदी गच्च भरुन गेली होती.

त्यांनी नदी ओलांडली. व ते तराफ्यावरुन खाली उतरले. त्याना किती आनंद झाला होता.

लवकरच ते कनायाला जाऊन पोचले.

'पालखीत बसणार का साहेब ?' एका पालखीवाहने विचारलं.

'याजी, तुझं काय म्हणणं ?' किटाने विचारलं. 'बसायचं ?'

'मला इच्छा नाही.' याजी म्हणाला, 'तुझी इच्छा असेल तर तूं बस.'

'तर मग मी निस्साकापर्यंत बसेन म्हणतो.' किटा म्हणाला. तो पालखीत शिरला. अधूनमधून पाऊस पडत होता आणि त्या कागो (पालखी) वर एक सतरंजीचा तुकडा पसरण्यात आला होता. किकुगावा पर्वतावर त्याना दोघेतिघे यात्रेकरू भेटले.

रस्त्यात त्या पालखीचा तळच निसटला व किटा धाडकन् खाली आदळला.

'ओ, ओ, ओ,' तो किंचाळू लागला.

'हा...हा...हा...' ते यात्रेकरू जोरजोराने हसले.

वाहक म्हणाले, 'महाराज, आपल्याला फार लागलं नाही ना ?'

'बदमाषांनो, असल्या 'कागो'त मला तुम्ही कां बसवलेत ?' किटानं विचारलं.

'फार वाईट वाटतं, साहेब,' वाहक म्हणाले.





अनुक्रमणिका

त्यांना शिव्या देत ते दोघे पुनः चालू लागले. एकदाचे ते **सायी–नो–नाकायामला** येऊन पोचले.

तिथून ते पर्वत उतरून **निस्साका**ला जाऊन पोचले. पाऊस चवताळला होता. सगळीकडे पाणीच पाणी झालं होतं व त्यांना आतां पुढे पाऊल टाकणं अशक्य होतं. शेवटी ते एका खानावळीच्या पडवीत आश्रयासाठी उभे राहिले.

'काय दगदग तरी!' याजी म्हणाला.

इतक्यात त्या खानावळीची मालकीण बाहेर आली.

'या पावसांतून तुम्हाला जाता येणार नाही,' ती म्हणाली 'या ना. इथेच रहा.'

'आपण थांबलं पाहिजे,' किटा म्हणाला, 'याजी, बघ! मागच्या खोलीत काही बायका उतरलेल्या दिसतात,'

'ए?..' याजीनं विचारलं. 'कुठे रे?'

'महाराज, आपण इथं थांबणार का?' म्हातारीने पुनः विचारलं.

थांबतो? याजी म्हणाला.

मागल्या बाजूच्या एका खोलीत त्यांना नेण्यात आलं.

'तुम्हाला काही खायला पाहिजे काय?' एका नोकराणीने त्यांना विचारलं.

'आम्हाला जेवण हवंय.' किटा म्हणाला.

'जरा गप्प बस. हळू बोल. समजलं?..' याजी म्हणाला.

'हळू बोलून बडबड करायची!..छान..' किटा म्हणाला.

जेवणाची ताटे आली आणि त्यांनी ताव मारला.

'म्हटलं,' याजीने त्या नोकराणीला विचारलं, 'त्या मागच्या खोलीत आलेल्या बाया कोण आहेत?

'त्या चेटकीणी आहेत.'

'काय, चेटकीणी?' किटाने विचारलं. कुणाला तरी बोलवूया.'

'आता उशीर झाला आहे. याजी म्हणाला. 'चार वाजल्यानंतर त्या येणार नाहीत.'

'आता तर कुठे अडीच वाजले आहेत,' ती नोकराणी म्हणाली.

'ठीक. मग जरा त्यांना विचार पाहू.' याजी म्हणाला,'मला माझ्या मृत बायकोशी बोलायला आवडेल.'

'छान कल्पना' किटा म्हणाला.

'मी त्यांना विचारीन' ती नोकराणी म्हणाली.

जेवणं झाल्यावर याजी व तिने त्या चेटकीणींना विचारलं. त्या कबूल झाल्या. किटाला त्यांच्या खोलीत नेण्यात आलं. तिथं त्या चेटकीणीनी आपली नेहमीची पेटी काढली आणि ती नीट मांडली. त्यांना काय हवं आहे हे ओळखून त्या नोकराणीने विहिरीतून पाणी काढलं आणि ते आत घेऊन आली.

याजीने आपल्या दिवंगत पत्नीचं ध्यान करीत, तिने पुढे केलेल्या झाडपाल्यावर थोडं पाणी सोडलं व एक लहानसा आरसा त्याने चेटकीणीला दिला. मग ती तरुण चेटकीण मंत्र म्हणू लागली. लावकरच तिच्या अंगात त्याच्या पत्नीचं वारं आलं.

'मी एकटीच आले आहे' ती म्हणू लागली.

'कोण तू?' याजीने विचारलं. 'हे काय चाललं आहे, मला कळेनासं झालं आहे.'

'ज्याने मला पाणी अर्पण केलं त्याच्यासाठी मी आले आहे,' माझा लहानपणचा ठेवा असा माझ्या देहाचा आरसा ज्याने मला दिला त्याच्यासाठी मी आले आहे.'

'देहाचा आरसा?' किटा उद्गारला. 'काय झालं आहे ते मी तुला सांगतो, याजी; ती तुझी आई आहे.'

'माझी आई, ए?.' याजी; बोलला. 'तिच्याबरोबर मला कहीच बोलायचं नाही.'

"माझ्या देहाच्या आरशाला माझ्याबरोबर काहीच बोलायचं नाही का?" चेटकीण पुढे बोलू लागली. 'माझ्याबरोबर, जी तुझी शय्यासोबतीण होती, जिला तू असा निर्लज्जपणे सप्तपाताळातून बोलवून आणलं आहेस? हाय, माझं तुझ्याशी लग्न झालं तेव्हां मला किती किती यातनांतून जावं लागलं–पुनः पुनः मला भुकेच्या कळा सोसाव्या लागल्या, हिवाळ्यात थंडीत कुडकुडावं लागलं. हाय! किती तिरस्करणीय?..तिरस्करणीय!'

'मला क्षमा कर,' याजी म्हणाला, 'त्यावेळी माझी परिस्थिती अगदीच खालावली होती.'

'अरे, याजी,' किटा म्हणाला, 'तू डरतोस की काय? हा–हा–हा? सैतानाच्या डोळ्यात सुद्धा अश्रू येतात तर!'

'मी ते कधीच विसरणार नाही,' ती चेटकीण पुढे बोलली, 'तू जेव्हा आजारी पडलास तेव्हां तुझं आजारपण मला दिलंस. आपलं एकुलतं एक मूल अन्नाविना खंगलं आणि मेलं. दर दिवशी सावकार लोक ठेकेदार येऊन धडका द्यायचे आणि भाडं दिलं गेलं नाही तरी सुद्धा मी तक्रार केली नाही...'

'ते आता काही बोलू नकोस.' याजी म्हणाला. 'माझं काळीज फुटेल, त्यामुळं'



## व्यवसाय कुणाचा ?

डॉ. जाधव आणि डॉक्टरीणबाई व्हिन्सेंट-रोडने फिरायला जात होते. दादर टी. टी. जवळ एका देखण्या, नखरेल तरुणीने हात उंचावून डॉक्टरांना अभिवादन केले. 'थांब–आता दोन मिनिटांत येतो हं' असं म्हणून डॉक्टर त्या तरुणीकडे गेले. थोडा वेळ गप्पा मारल्या आणि पुन्हा डॉक्टरीणबाईजवळ आले.

'कोण होती हो ती महामाया?' डॉक्टरीणबाईनी विचारले. 'नांव काही लक्षात नाही. पण अशीच व्यवसायानिमित्त ओळख झाली.

'व्यवसायानिमित्त? तिच्या की तुमच्या?' बाईनी संशय व्यक्त केला.

"आणि पुन्हा, मी कष्टाने मिळविलेला किमोनो मला तुझ्यासाठी गहाण ठेवावा लागला आणि पुनः काही तो दृष्टीला पडला नाही."

"पण तू आता किती सुखाच्या स्थळी पडली आहेस," याजी म्हणाला, 'आणि मला इकडे अजूनहि सतत काळजी करावी लागतेच आहे.'

'इथं सुखदायक असं काय आहे ? हे खरं की तुझ्या मित्रांच्या सहाय्याने तूं माझ्या थडग्यावर एक शिलाखंड उभा केलास. पण तू कधीच त्याच्याजवळ जात नाहीस. देवस्थानाला पैसे देत नाहीस व धर्मगुरूना बोलवीत नाहीस. माझ्या थडग्यावरचा शिलाखंड नेऊन आता भिंतीत घालण्यात आला आहे. थडग्यावर कधी थेंबभर पाणी टाकण्यात आलं नाही. खरंच, आम्ही मेल्यावरही नाना दुःखे भोगतो आहोत.'

'खरं. अगदी खरं.' याजी म्हणाला.

'पण तूं अशी माझी हेळसांड करीत आहेस' ती चेटकीण पुढं बोलू लागली,' तरी या थडग्यांत पडून मी तुझ्याखेरीज कुणाचाच विचार करीत नाही. या पाताळलोकात तूं मला येऊन कधी भेटशील याची मला तळमळ लागली आहे. मी तुला भेटायला येऊ का ?'

"नको, नको, तसं काही करू नकोस," याजी म्हणाला, 'खरोखर तुला आता फार दूरवर यावं लागेल.'

'अच्छा मग माझी एक विनंती आहे.'

'काय आहे ती ?'

' या चेटकीणीला भरपूर पैसे दे.'

'देईन.'

'निरोप घेणं किती दुःखाचं असतं !' ती चेटकीण रडू लागली. 'मला तुला अजून खूप काही सांगायचं आहे. पण नर्काचा निरोप मला बोलावतो आहे.'

मग आपल्या तंद्रीतून ती चेटकीण बाहेर आली.

'तुझा फार आभारी आहे', याजी म्हणाला. त्याने थोडे खिशातून पैसे काढले आणि तिला दिले.

'हा..हा..हा..!' किटा हसू लागला. 'आता तुझी सगळी लाज जगासमोर उघडी पडली आहे. तुझा चेहरा उतरलेला दिसतो. थोडं मद्य पिण्यावद्दल तुझं काय मत आहे ?"

याजी कबूल झाला व त्याने नोकराणीला साकी आणायला फर्मावलं.

'किती लांबवर चाललात आज ? . . .' चेटकिणीने विचारलं.

'आम्ही ओकाबेहून आलो.' याजीनं उत्तर दिलं.

'किती झरझर चालता तुम्ही . . .' चेटकीण उद्गारली.

'ओ, ते काहीच नाही.' याजी म्हणाला. 'आम्ही ईडाटेन-पर्यंत सुद्धां चालूं शकतो. तशीच वेळ आली तरं आम्ही दिवसाला पस्तीस मैल सुद्धा चालूं शकतो.

'पण मग पुढील दहा दिवस तरी आम्ही कोणत्याहि कामाला निरुपयोगी ठरतो.' किटाने मध्येच तोंड घातलं.

ते अशा रीतीने बोलत असतानाच साकीचे पेय आले.

'तूं थोडं घेशील ?'.. याजीने त्या तरुण चेटकिणीला विचारलं.

'मी थेंबाला सुद्धा स्पर्श करीत नाही.' ती उत्तरली.

'तुझ्या सोबतीणीला तरी थोडं चालेल कां ?' याजीने विचारलं.

'आई, आई ! इकडे ये.' त्या तरुण चेटकिणीने हांका मारल्या.

'ओऽती तुझी आई आहे काय ?' किटाने विचारलं. 'तिच्यासमोर जरा जपून बोललं पाहिजे. 'तूं थोडं पेय घे ना ?

त्यानी प्यायला सुरुवात केली. आणि ते मजा लुटू लागले. तथापि, त्या चेटकिणी, कितीहि प्याल्या तरी त्यांच्यावर कसलाच अंमल चढलेला दिसत नव्हता; पण याजी आणि किटांनी इतकी ढोसली की, त्यांना धड सरळ बोलता येत नव्हतं. शेवटी पुरता झिंगून किटा चेटकिणीच्या आईला म्हणाला, तू मला तुझी मुलगी आज रात्रीपुरती देशील काय ? . .'

'छे, छे, ती मला देणार आहे,' याजी म्हणाला.

'छान कल्पना !' किटा ओरडला. 'आज रात्री चांगला वाग. तुझ्या मृत बायकोची तुला दया वाटत नाही काय ? बिचारी ती तुझा सारखा विचार करते आहे आणि तू लवकर येऊन तिला भेटशील अशी तिला आशा वाटते आहे. ती म्हणाली नाही काय की, तीच येईल आणि थोड्या वेळाने तुझी भेट घेईल ?

'असलं काही बोलू नकोस,' याजी म्हणाला, 'ती मला भेटायला आली तर मी काय करू, असं तुझं म्हणणं आहे ?"

'तू तिच्याशी चांगला वाग.' किटा म्हणाला. 'ए म्हातारे, तुझं काय म्हणणं आहे ?'

किटाने त्या तरुण चेटकीणीला मिठीत घेतलं पण तिने त्याला ढकलून दिलं आणि ती दूर पळाली. 'शांत हो' असं ती म्हणत होती.

'माझ्या मुलीला तू नकोसा असशील तर', ती आई म्हणाली, 'मी चालेन का ?'

'अच्छा, तशीच वेळ आली तर ती तू आहेस की ती, याची मला पर्वा नाही.' किटा म्हणाला. तो अजून झिंगून स्वप्नातच जगत होता.

तेवढ्यात जेवण आले. साकीचा अंमल पूर्ण उतरल्यावर याजी आणि किटा आपल्या खोलीत गेले. शेजारच्या खोलीत सुद्धा, त्या चेटकीणी प्रवासानंतर दमून भागून झोपी जाण्याची तयारी करीत होत्या, हे जाणवत होतं.

'ती तरुण चेटकीण या बाजूला झोपणार आहे, मला ठाऊक आहे,' किटा हलक्या आवाजात म्हणाला. 'थोड्या वेळाने मी हळूच तिच्या बिछान्यात शिरणार आहे. याजी, तू निमूटपणाने आता झोपी जा.'

'चालता हो.' याजी ओरडला, 'मी तिला पकडणार आहे'. 'किती धीट आहे हा !' याजी म्हणाला. 'मांजर सुद्धा हसेल याचे चाळे पाहून.'

बोलता बोलता ते बिछान्यात शिरले व झोपी गेले. नुकतेच नऊ वाजले होते. रात्रीचा गस्तवाला खानावळी भोवती गस्त घालीत होता. काळोखात किताहाची उठला व त्याने त्या चेटकिणीच्या बिछान्यात शिरायचं, नक्की ठरवलं. तो हळू हळू पावले टाकीत आत गेला आणि तिथं ती तरुण चेटकीण झोपली आहे असं त्याला वाटत होतं, त्या बिछान्यात शिरला. आश्चर्य म्हणजे, त्या चेटकिणीनं त्याला काही न बोलता, हाताला धरले व आपल्याकडे खेचून नेलं. या स्वागताने आनंदित होऊन किताहाची तिच्या पांघरूणात शिरला. तिचा हात त्याने उशीला घेतला आणि लवकरच त्याची कामवासना पुरी करून घेतली. मग ती दोघे अगदी गाढ झोपी गेली. भोवतालच्या जगाचा त्याना पार विसर पडला होता.

लवकरच याजीरोबी जागा झाला व त्याने डोळे उघडून पाहिलं. 'किती वाजले असतील बरं. .' तो पुटपुटला. 'मला मोरीत जाऊन आलं पाहिजे. इतका काळोख आहे की काही दिसत नाही.'

अशा रीतीने आपण मोरीत जात आहोत असं ढोंग करीत तो शेजारच्या खोलीत शिरला. किताहाची अगोदरच तिकडे गेला आहे याची त्याला मुळीच कल्पना नव्हती. हाताने चाचपडत तो किताहाची झोपला होता त्या बिछान्याकडे आला. काळोखातच विचार करताना त्याला वाटले ही तरुण चेटकीण आहे. तिच्या ओठातून हुंदके येत आहेत, म्हणून त्याने आपले ओठ किताहाचीच्या ओठावर टेकले व त्यांना दाताने दंश केला.

'ओय्. . .ओय्. . .' किताहाची किंचाळत उठला.

'अरेच्या ! . . . .तू आहेस काय, किताहाची ?–' याजीने विचारलं.

'ओय्–याजी का ?' किटाने विचारलं. "ऊ. . . . . .ऊ. . . किती पशुतुल्य हे तुझं वर्तन ? . .'

त्यांची गडबड ऐकून किटा ज्या बिछान्यात झोपला होता, ती चेटकीण जागी झाली.

'तुमचं काय चाललं आहे ?' तिने विचारलं. 'इतका मोठा आवाज करू नका. तुम्ही माझ्या मुलीला उठवाल–'

किटावर हे आणखी एक आश्चर्य कोसळलं. त्या म्हाताऱ्या चेटकीणीचा आवाज होता. आपल्या मूर्खपणाला शिव्या देत तो बिछान्यातून उठला व शेजारच्या खोलीत हळू हळू सरकत गेला. याजी पण तसाच जाणार होता इतक्यात त्या म्हाताऱ्या चेटकिणीने त्याला घट्ट पकडून ठेवला.

'एका म्हाताऱ्या बाईला टाकून पळून जाताना तुला लाज वाटली पाहिजे.' ती म्हणाली.

'छे, छे,' याजी हं, ट, फ, फ,' करीत बोलू लागला. तुझी चूक होते आहे. तो मी नव्हे.'

'तू मला फसवण्याचा प्रयत्न करू नकोस.' ती म्हणाली. 'मी काही बाजारबसवी नाही. पण जेव्हा मला असा एखादा प्रवाशी भेटतो आणि मी त्याला शय्यासोबत करते, तेव्हा पुढच्या प्रवासासाठी मला त्याच्याकडून पैसे घ्यावेसे वाटतात. मला फसवून पळून जाताना तुला काही तरी लाज वाटायला हवी होती. चल. सकाळपर्यंत माझ्या कुशीत डोकं खुपसून झोप पाहू !'

'कटकट आहे बुवा !' याजी म्हणाला. 'अरे किताहाची, किताहाची.'

'स्वतःला' आवर. 'एवढ्या मोठ्याने शंख करू नकोस.'

'पण मला यातलं काहीच ठाऊक नाही.' याजी बोलला. 'त्या किताहाचीनं मला या सगळ्या लफड्यात गुंतवून ठेवले आहे. . . .तो लफंगा..'

असं म्हणत याजीने तिच्या तावडीतून सुटण्याची खूप धडपड केली. पण ती त्याला पुनः पुनः पकडून ठेवीत होती व खाली जमिनीवर लोळवीत होती. खूप लाथाळी केल्यावर, एकदाचा तो तिच्या मिठीतून सुटला. आणि स्वतःच्या खोलीत पळाला. तिथे बसून तो पुनः पुनः स्वतःशीच गात होताः

चोरून मी एका खोलीत शिरलो,
तिथे होती एक चेटकीण,
मला हवं होतं तिचं प्रेम
पण तिने केलं चेटूक,
आणि कुण्चं चेटूक न् कुण्ची चेटकीण
हेच काही मला कळेनासं झालं. ●●●




अनुक्रमणिका








त्या गाडीतल्या गलेलठ्ठ माणसाला 'सरकारी' काम होतं. घाईचं काम होतं. खेड्यातला 'गहूं' त्याला न्यायचा होता. तिथल्या बायका 'बऱ्या' असतात असेही त्याचे बऱ्यापैकी मत होतं.

—पण रस्ता बरोबर असूनही 'वाट' (मात्र) चुकली होती.

# असा चुकतो रस्ता

— रॉक कार्व्हालो

"हट्ट् हट्! चला बेटचांनो! पळा, दौडा—"

चावकाचे फटकारे घोड्याच्या पाठीवर ओढीत गाडीवान पोरगा गाडी हांकीत होता. घोडा–गाडीची चाकं चिखल उडवीत जोरजोरानं पळत होती. रस्त्यात पाणी जिरलेल्या ठिकाणी गाडीचा खिळखिळा सांगाडा खडखडत होता. पुढच्या बैठकीवर गाडीवान पोरगा तोल सांभाळीत आरामशीर आणि आपली टोपी पाठीमागं ओढून स्वत:शीच काहीतरी गुणगुणू लागला.

"नांव काय रे तुझं पोरा?" घोडागाडीत मागच्या बाजूला बसलेल्या गलेलठ्ठ माणसानं विचारलं. त्यानं आपलं अंग लोकरीच्या जाडजूड कोटात गुरफटून घेतलं होतं. पोरगा आपला गुणगुणण्यातच मग्न होता.

"ए पोरा !" त्या लठ्ठ भारतीनं घोगऱ्या आवाजात पुन्हां विचारलं, "तुझं नांव ?"

"आन्द्रेस्को."

"हां. आन्द्रेस्को काय ! मोठा लवाड दिसतोस. तुम्ही शेतकरी लोक सगळेच मतलबी. खोटेपणा नि लवाडी तेवढी तुम्हाला ठाऊक. आणि वर साळसूदपणाचा आव केवढा ! कोर्टात बघतो मी तुम्हा लोकांना. बाहेरून जशी काही गरीब कोकरं, पण आंतून पक्के लांडगे ! जज्जसमोर नुसता देखावा करतात साले !"

"आम्ही साधीसुधी माणसं साहेब. खरंच ! लोक आम्हाला उगीच नांवं ठेवतात. तुम्हाला वाटतं तसं नाही. आम्ही शेतकरी लोक भोळसट असतो, म्हणूनच सावधगिरीनं वागतो. केवळ साधेपणामुळं—गरिबीमुळं—"

"आहारे गरिबी ! तुम्हा लोकांना चावकाचे फटकेच पाहिजेत. गरिबाची सबब सांगता आणि सारखे 'पीत' असता!"

"पण ते तसं का करतात ठाऊक आहे? मजेत असतात म्हणून ? छट् ! दारू पितात खरं, पण काळजी विसरण्यासाठी. त्यांना काळजी आणि जाच कमी नसतो काही ! तुमच्यासारख्यांना कळायला हवं–'

"छान छान ! तू सुद्धा झोकली आहेस वाटतं. अरे तरणा पोरगा ना तूं ? अजून मिसरूड नाही फुटली तुला ! . . . तुम्ही शेतकरी लोक ना ? दुसऱ्यांना बुडवणारच ! अगदी लिहून ठेवावं !"

"तुम्हीच लिहा साहेब ! आपल्याला नाय् लिहिता येत," असं म्हणून गाडीवान् पोरगा घोड्याकडे वळला. "हट्. बेटचांनो ! हट् हट्. . ."

घोड्यांना दामटता दामटता तो स्वत:शीच विचारात गढून गेला. घोडे भरधाव पळत होते.

गाडी चिखलातून खडखडत, वरखाली होत आणि हिसकळत चालली होती. अधूनमधून गाडीचे खिळखिळे भाग खळखळायचे आणि जाडजूड लोकरी कोटातल्या त्या लठ्ठ इसमाचा जीव घाबरा व्हायचा ! शेवटी तो त्रासून कपाळाला आठ्या घालीत म्हणाला, "काय खडखडाट हा ! शरीराला आरामसुद्धा नाही थोडा. मला नाही सोसवत हे हिसके आणि हादरे–"

"माझ्या गाडीचा एक स्क्रू झालाय् सैल. शिकलेल्या माणसासारखी हिची सारखी खिटखिट चालते !"

"तूं तर पक्का इब्लिस आहेस. मोठा चतुर ! लग्न नसशील केलं तर आतां करून टाक. तुम्ही लोक अगदी कोवळ्या कोवळ्या पोरींशी लग्न करता. फक्कड असतात बायका तुमच्या !"

"तुम्ही काय बी म्हणा साहेब, पण आम्हा लोकांना बायकांबद्दल फारसं काही वाटत नाय्. ते जाऊ द्या. पण तुम्ही काय काम काढलंत आमच्या खेड्यात आज ?"

"मी बेलिफ आहे. कोर्टातला. सरकारी जप्तीवाला !"

आन्द्रेस्कोनं एकदम मागं वळून बेलिफाचा चेहरा निरखून घेतला.

"म्हणजे—तुम्ही कुणावर तरी जप्ती घेऊन आला आहात ?"












"हो. जप्ती. तुमच्यापैकी एकजण मला केव्हापासून हुलकावण्या देतो आहे. सारखा बनवायला बघतो आहे. पण यावेळी मात्र मी त्याला बरोबर दाखवणार. कित्तीतरी वेळा मी त्याच्या मागावर राहिलो, पण दरवेळी तो निसटायचा. आज रात्री त्याला असा धरतो कचाट्यात की ज्याचं नांव ते! पक्की आठवण राहील त्याला. जप्तच करून टाकतो त्याचा गहू. अशीच अद्दल घडवली पाहिजे तुम्हा लोकांना, म्हणजे मग वठणीवर याल तुम्ही. बनवता काय् लेको दुसऱ्यांना? व्यापाऱ्यांना नि शहरातल्या लोकांना फसवता नाही का कुजकी अंडी आणि खोमट लोणी विकून? पण आमच्यासारख्या सरकारी माणसांना फसवायच्या गोष्टी द्या सोडून. चाबकानं फोडून काढलं पाहिजे एकेकाला. अट्टल दारुडे वदमाप कुठले! पुरे बिघडून गेले आहेत. तुम्ही करबुडवे लोक सरकारला बुडवाल एक दिवस! माझ्या हातांत जास्त सत्ता असती, तर कसे सरळ आणले असते सगळ्यांना!"

वेलिफाचा पारा चढला होता. संतापानं त्याचा चेहरा लाल झाला होता. बोलता बोलतां त्यानं आपल्या कोटाचं बटण सैल केलं. कोटाआड त्याच्या ढेरेदार पोटाची अशी काही हालचाल होत होती की अंड्यातून बाहेर येऊं पाहणारं जसं कोंबडीचं पिल्लूच!

"बरं का, वेलिफसाहेब," आन्द्रेश्को बोलू लागला, "देवानं जग तयार केलं, त्याचवेळी ठरवलं की, बायकांना दाढी देऊ नये, कारण त्यांना दाढीची जरूर नाही. गाढवांना लांब कानांची जरूरी आहे, तेव्हा त्यांना दिले लांब कान—"

"उगीच बडबड नको. गाडी हाक अगोदर जोरात. काळोख पडत चाललाय् ....आणि भाडं मात्र मोठं मागतो आहेस. केवळ वीस किलोमीटरचं तर अंतर. आमच्यासारख्यांना लुबाडायचं बरं कळतं की तुला! चल हांक गाडी. जाऊ दे लवकर. तुझी ही रत्नं झोपलीत बघ! दामट त्यांना!"

"चला रे बेट्यांनो! पळा. हट् हट्—हटाट् हटाट्—"

"त्यांना 'बेटे' म्हणतोस? त्यापेक्षा 'भाऊ' म्हण की!"

"तशानं त्यांना राग येईल वेलिफसाहेब. 'बेटे' नाही म्हटलं तर त्यांना अपमान वाटायचा—"

"कुठं एवढी प्यालास रे? बोल आधी. नसती वटवट चालवली आहेस! लगाव चाबूक या आळश्यांना. उशीर होतोय् फार. रात्र व्हायच्या आंत पोचलं पाहिजे मला खेड्यात. जप्ती घेऊन चाललोय् मी... बघतोस काय असा? आणि डोळे कसे कावेबाज आहेत हरामखोराचे!"

"काही काळजी करू नका साहेब. लांडगे नाहीत इथं आसपास." आन्द्रेश्कोनं लांडग्यांचा उल्लेख करताच वेलिफ असा काही घाबरला, की त्यानं सभोवती नजर फिरवून लांडगे नसल्याची खात्री करून घेतली.

"लांडग्यांना नाही भीत मी. पण थंडी लागतेय् ना!"

"हे पोत घ्या अंगाभोवती गुंडाळून. माझे घोडे नाहीत कधी थंडीबद्दल कुरकुरत."

थोडा वेळ कुणीच काही बोललं नाही. आन्द्रेश्कोच्या डोक्यात मात्र केव्हापासूनच एक कल्पना घोळत होती. जप्ती आलेल्या शेतकऱ्याला वाचवलं पाहिजे. रात्रीतून गहू कुठतरी लपव आणि कोठी रिकामी करून ठेव म्हणून त्याला सूचना दिली पाहिजे. नाही तर वर्षभर पोटाला चिमटा घेऊन त्याला नि त्याच्या बायकापोरांना जगावं लागेल. बिचाऱ्यावरचं संकट टळलच पाहिजे. त्याला मदत करायलाच हवी—करायलाच हवी... गरीब बापड्या शेतकऱ्यांना निष्कारण शिव्या शाप देऊन आणखी वर त्यांचं धान्य जप्त करायला निघालाय् हा ढेरपोट्या. कळायलाच हवं याला की जप्तीचा रस्ताच चुकीचा आहे...

अंधार वाढत गेला. दाट चिखलाखेरीज काहीच दिसेना. रस्ता तर चिखलात हरवलाच होता.

मध्येच एकाएकी आन्द्रेश्कोनं लगाम खेचले. "थांबू या जरा. रस्ता चुकला वाटतं." तो म्हणाला.

वेलिफ तंद्रीतून ताडकन् जागा झाला. आन्द्रेश्कोवर डोळे वटारून त्याला दरडावीत तो म्हणाला, "रस्ता चुकला? कसा चुकला? भलतंच काही झालं तर बघ. चोपून काढीन, सांगतो!"

आन्द्रेश्कोनं लगाम तसेच ताणून धरले नि चाबूक हवेत घुमवीत तो म्हणाला, "वेलिफसाहेब, हे लगाम धरा असे खेचून!"






अंधारात काही अंतरावर दिवे लुकलुकत होत. कुत्र्यांच्या भुंकण्यावरून खेडं जवळच असावसं वाटत होत. उजवीकडे घोड्याच पावलांवर-संथ पाण्याच्या पृष्ठभाग तळपत होता. गाडी थेट त्या पाण्याकडेच वळली.

"अरे अरे हे काय !" वेलिफ घावरून किंचाळला.

"काही नाही. दलदल ! रस्ता या दलदलीतूनच जातो. उथळ जागा आहे. अधून मधून थोडे खळगे आहेत एवढंच. कितीतरी वेळा गाडीनं मी ते ओलांडले आहेत. हट् वेटचांनो ! हट्—हटाट् हट् ! लगाम घट्ट धरून ठेवा म्हटलं साहेब !"

घोडे पाण्यात उतरले. वरचं आकाश पाण्यात उतरलं होतं. गाडीची चाकं खोल खोल रुतत होती.

"अरे थांबव थांबव !" वेलिफ वेड्यासारखा ओरडत सुटला. "लगाम तुझ्या हाती घे—मला नाही हे जमायचं—अरे धर ! बुडवतो आहेस काय मला! साल्या हरामखोरा ! गाडीमध्ये पाणी शिरतंय् समजत नाही ? थांबव, थांबव आधी !" असं म्हणून त्यानं आन्द्रेश्कोला शिव्या देत त्याचा उद्धार करायला सुरुवात केली.

आन्द्रेश्कोनं पुढं होऊन घोड्यांना आवरलं. गाडीचा खालचा सगळा भाग पाण्याखाली दलदलीत रुतला होता. दलदलीच्या जागेचा शेवट कुठंच दिसत नव्हता. आन्द्रेश्कोनं घोड्यांच्या पाठीवर थाप मारून दटावलं, "चला वेटचांनो, पुढं—चला रे—"

वेलिफकडे वळून त्यानं म्हटलं, "भिऊ नका साहेब. अंधारांत रस्ता चुकतो कधीकधी असा ! शांत राहा तुम्ही. काही काळजी करू नका. सगळं ठीक होईल बघा !"

बोलता बोलता त्यानं घोड्याचे पट्टे सोडले नि गाडीच्या पुढच्या दांडीवर बसून घोड्यांना इशारा दिला, "चला पुढं. . . हट् वेटचांनो—"

घोडे चालू लागले. एका घोड्याच्या मानेवरून जू सटकलं नि तो मोकळा होऊन सरळ पळत सुटला !

दातओठ चावीत वेलिफ खेकसला, "छान छान ! आता आणलीस का पंचाईत, साल्या—"

"वेटचाऽऽऽ ! अरे थांब, थांब—" म्हणून पळणाऱ्या घोड्याला आन्द्रेश्कोनं हाका मारल्या, पण तो अंधारात दिसेनासाच झाला ! वेलिफाच्या हातून लगाम केव्हाच सुटले होते नि तो चळचळा कापत गाडीमध्ये कसावसा तोल सांभाळीत उभा होता. आन्द्रेश्को चपळाईनं दुसऱ्या घोड्यावर स्वार झाला नि पहिल्या घोड्याला हाका मारीत त्यानं टाच मारली !

आता मात्र वेलिफ गर्भगळित झाला. त्याच्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला. पुरी बोबडी वळली त्याची. घोगऱ्या आवाजात तो आक्रोश करू लागला, "अरे पण मला एकट्याला कां टाकून चाललास ? ए वदमाप ! मी इथं मरून जाईन की ! –कोल्हेलांडगे मला फाडून खातील ! —अरे माझ्या देवा ! मेहेरबानी कर एऽऽ आन्द्रेश्को !—आन्द्रेश्को मागं फीर—अरे बघ तरी—अडकून पडलो मी —देवा रे ! तू तरी धाव—"

अंधारात दूरवरून फक्त जोरजोरात हसण्याचा आवाज आला, नि त्यामागून शब्द आले, "भिऊ नका जप्तीवाले वेलिफसाहेब ! रस्ताच चुकला त्याला काय करणार ! लांडगे चिखलात शिरत नाहीत. अन् लांडग्यांना तुम्ही भीत नाय् म्हणालात ना ? नकाच भिऊ–पोतं घ्या लपेटून अंगाभोवती, म्हणजे थंडी नाय् वाजायची . . . . उद्या सकाळी येतो तुम्हांला न्यायला. तोपर्यंत सुखरूप राहा. गाडीमध्ये पेंढा आहे तो अंथरा अन् झोपा त्यावर. त्यावद्दल भाडं नाही घेणार मी तुमच्याकडून . . . ."

वेलिफ कावराबावरा नि हवालदिल होऊन गयावया करू लागला, "अरे पण मागं फीर ना ! हवे तेवढे पैसे देतो तुला. पण सोडव मला–वांचव मला–माझा जीव धोक्यात आहे बघ–माझे आईऽऽ–काय करू आता . . . काय करू . . ."

गडद अंधाराशिवाय आता कुणीच नव्हतं त्याचं ऐकायला. पण अंधाराकडूनहि त्याला काहीच उत्तर मिळालं नाही !!

●●●

[एलीन् पेलीन् या लेखकाच्या बल्गेरियन कथेचा स्वैर अनुवाद]


Statement about ownership and other particulars about newspaper 'Dipavali" Monthly
FORM IV (SEE RULE 8)

| | | |
|---|---|---|
| 1. | Place of publication... | Dalal Art Studio, 42, Kennedy Bridge, Bombay—4. |
| 2. | Periodicity... | Monthly, on 1st of every month. |
| 3. | Printers' Name... | Shri Dinanath Damodar Dalal. |
| | Nationality... | Indian. |
| | Address ... | 42, Kennedy Bridge, Bombay—4. |
| 4. | Publishers' Name, Nationality and Address | As per 3 above. |
| 5. | Editor's Name, Nationality and Address... | As per 3 above. |
| 6. | Names and addresses of individuals who own the newspaper and partners or shareholders holding more than one percent of the total capital. | Shri Dinanath D. Dalal, Sole proprietor. No partners or Shareholders. |

I, Dinanath Damodar Dalal, hereby declare that the particulars given above are true to the best of my knowledge and belief.

D. D. Dalal
Signature of publisher.

Date 1-3-1966







अनुक्रमणिका



—श्रीराम
कामत

**इटालियन विनोदाचा एक खास नमुना. तेथील 'मार्टिनी' नांवाच्या दारू सारखाच. थोडा कडू, थोडा गोड, किंचित् झोंबणारा, चावणारा, अतिशयोक्ति नाहीच. तीव्र वास्तववाद. थोडा तात्विक. बौद्धिक सुद्धा असा हा साहित्यप्रकार आहे. वाचून खदखदून हंसू येणार नाही. ओठा-वर फक्त स्मित फुटेल—आणि मनात कोणाला काय न् कोणाला काय—नक्की नाही सांगता येणार.**

**उत्तर** इटालीत पो नदीच्या काठावरील एका गांवात गेली कित्येक वर्ष कॉम्रेड पेपॉन हा कम्युनिस्ट पक्षाचा माणूस मेयर होता. ह्या अवधीत त्यानं लोकोपयोगी या सदरात नमूद होतील अशा बऱ्याच गोष्टी केल्या. पैकी सरळ डोळ्यात भरणारी एकच—'जनता—प्रासाद' या जबरदस्त नांवानं गांवात दिमाखात उभी असलेली तितकीच जबरदस्त, टोलेजंग इमारत. पेपॉन आणि त्याच्या टोळक्याचं हे श्रद्धास्थान होतं. त्यांच्याच शब्दात सांगायचं म्हणजे कामगारांच्या त्यागाचं हे प्रतीक होतं. त्यांच्या एकजुटीचं अन् श्रमाचं मानचिन्ह होतं. जनतेच्या क्रान्तीची जळती मशाल होती.....वगैरे वगैरे वरचं!

तर ह्या जनताप्रासादाचं सभागृह बांधून पूर्ण झालं तेव्हाची वार्ता. सभागृहाच्या उद्घाटनानिमित्त कॉम्रेड पेपॉननं सिनेमांचा जंगी कार्यक्रम जाहीर केला. अर्थात जनतेसाठी. त्याचा प्रत्येक कार्यक्रम जनतेसाठीच असायचा. गांवात ठिकठिकाणी तसे बोर्ड लागले. गजबजत रोज-जाहिराती वाटल्या जाऊ लागल्या. बातमी घरोघर तुडुंब भिजली. गांवची माणसे उत्साहानं डुंबू लागली.

कोरडा होता एक डॉन कॅमिलो. तो नाखुश होता, नाराज होता.

गांवचा हा पाद्री होता. तसा भला माणूस. 'भले तरी देऊ कासेची लंगोटी' या पंथातला. पण गंमत अशी त्याच्या कमरेला लंगोटीच उरली नव्हती. पाद्री एकूण धोरणी खरा. पेपॉनच्या कारस्थानाचा त्याला सगळा बरोबर अंदाज होता. म्हणूनच 'लोकशाही धोक्यात आहे. सिनेमा दाखविण्याचं एक यंत्र पहिल्या विमानानं पाठवून द्या' अशा अर्थाच्या तारा कित्येक महिने तिकडे अमेरिकेत तो करून राहिला होता. विचारा! नाहीतरी लोकशाहीला दफ्तर दिरंगाई हा शाप आहेच! याला डॉन कॅमिलो झालो तरी काय करणार? अमेरिकेच्या पहिल्या विमानाची वाट बघणं आणि तोवर गांवात तोंड चुकवून दिवस काढणं या दोनच गोष्टी तूर्त त्याला करता येण्यासारख्या होत्या.

परिस्थिती ही अशी. कठीणच. आणि तो रविवार उजाडला. आजपासून रोज रात्रौ जनताप्रासादात पेपॉनचा सिनेमाचा जनता शो सुरू होणार होता.

सकाळच्या प्रार्थना एकदाच्या आटोपल्या. आणि तसं पाद्र्यानं तडक घर गांठलं. दारं—खिडक्या सगळं बंद करून चूपचाप हा घरात बसून राहिला. आज तो मुळी बाहेरच पडणार नव्हता. त्याला फुकट ताप नको होता. गांवात कुणी खवटपणं काहीबाही बोलायचं, ह्यानं मग टाळकं फिरवून घ्यायचं, सर्रास तोंड सोडा-यचं....छेः! नकोच ते. अर्थ नव्हता. तशात कॅमिलोपाशी लोकांना सांगण्यासारखं खास काही नव्हतं. लोकानाही हे माहीत होतं. आणि याचंच त्याला वाईट वाटत होतं.

# असंगाशी संग, देवाशी गांठ

पिंजऱ्यात अडकून पडलेल्या श्वापदासारखी त्याची दशा झाली होती. दिवसभर तो नुसत्या येरझारा घालीत होता. त्वेषानं हात चोळत, स्वतःशीच जळफळत, फडफडत स्वारी राहिली होती.

संध्याकाळला वर आकाश भरून आलं. सोसाट्याचं वारं सुटलं. पाऊसही सुरू झाला. वादळाचा रंग दिसू लागला. बाहेर झपाट्यानं बदलत गेलेल्या या वातावरणाकडे डॉन कॅमिलोचं काही लक्ष गेलं नाही. तो आपल्याच विचारात होता.

रात्री दहाच्या सुमारास त्याचा एक दोस्त वर्दी घेऊन आला. ओल्या चिप्प कपड्यात. उत्साहानं निथळत.

'काय रे, भिजलास कसा?" त्यानं दोस्ताला विचारलं.

"आं!" पण दोस्ताच्या ध्यानात आलं. तो हंसत बोलला, "खिडक्या उघड आता. अरे पाऊस पडतोय बाहेर. वादळ आलंय्..."

तसा पाद्र्याचा चेहरा समाधानानं खुलला. तोंडावर तेज आलं. सबंध दिवसात हे आताच कुठं त्याच्या मनासारखं घडत होतं.

आणि मग दोस्तानं सांगितलं, "अरे ह्या वादळामुळं सिनेमा बोंबलला. थिएटरात होतंच कोण? चार वांड कारटी आणि घरदार नसलेली काही भटकी लोकं, बस्स!! बाकी शुकशुकाट. आणि मी म्हणतो ह्या अशा वादळात घराबाहेर पडायला जनता झाली म्हणून काय गाढव वाटली! ह्यांना विजेच्या दिव्यांची नेहमीचीच रड. येताहेत, जाताहेत. पण पांच मिनटं टिकायला काही कबूल नाहीत. तर जनताप्रासादात ही परिस्थिती, करतात काय? झक् मारीत खेळ रद्द करावा लागला. पेपॉनचं तोंड मात्र बघण्यासारखं झालं होतं. असा पेटला होता, धुमसत होता— काही विचारू नकोस."

दोस्त वाटेला लागला. तसा मागं कॅमिलोदेखील चर्चमध्ये क्रूसावरल्या ख्रिस्ताकडे धांवला.

ख्रिस्ताच्या पायावर डोकं ठेवून हा उचंबळून म्हणाला, "देवा, कमाल आहे तुझी!"

"बेटा, कशाची कमाल?"

"हे वादळ...वीज बंद पाडणं...." पाद्री भारावून सांगत होता.

"कॅमिलो माझा ह्यात संबंध नाही." ख्रिस्ताने गंभीर स्वरात म्हटलं. "मी धंद्यानं सुतार. इलेक्ट्रीशियन नाही. तुला हे ठाऊक आहे. आणि ह्या वादळाबद्दल म्हणशील तर तुझ्या त्या पेपॉनचा सिनेमा रद्द व्हावा म्हणून वारा, ढग, वीज, पाऊस वगैरे पंचमहाभूतांना वेठीला धरील इतका सर्वशक्तिमान परमेश्वर नालायक नाही."

पाद्र्याची मान आपोआप खाली गेली. नरमून तो पुटपुटला, "देवा, तुझंच बरोबर! एखादी गोष्ट मनासारखी झाली की त्याचं श्रेय देवाला द्यायची माणसाला वाईट संवय आहे. जसा काही आम्हाला खुश करण्यासाठीच देवाचा जन्म आहे".

**

**मध्यरात्रीपर्यंत** वादळ हळूहळू कमी झालं. पण मग पहाटेला त्याला पुन्हा जोर चढला. कसल्यातरी प्रचंड स्फोटानं हादरून कॅमिलो जागा झाला. धडपडत खिडकीकडे धावला. डोळे चोळत बघू लागला. बघतच राहिला. तसाच. आश्चर्यानं, डोळे फाडफाडून. तोंड उघडं—मिटायचं भान नव्हतं.

चर्चच्या मनोऱ्यावर वीज पडली होती. सरळ, सहजगत्या. इतर कुठंही पडते तशी.

ती घटनाच इतकी असंभवनीय, अशक्यकोटीतील होती की कधी एकदा ही बातमी ख्रिस्ताला सांगतो असं पाद्र्याला झालं.

दारातूनच हा ओरडला, "देवा अरे हे काय झालं?"

"आस्ते बेटा, हळू बोल. नाही बोललास तरी ऐकू येतंय् मला". ख्रिस्तानं भक्ताला आवरलं.

"तुझ्या चर्चवर वीज पडली, देवा, आणि मला सांगतोस आस्ते बेटा—"

"मला ठाऊक आहे." ख्रिस्ताचा आवाज नेहमीसारखाच होता. शांत, थंड. वादळात इमारतींवर विजा पडायच्याच."

डॉन कॅमिलोनं समोर क्रूसावरल्या ख्रिस्ताकडे उद्वेगानं पाहिलं. हताशपणानं हात उडवला. कपाळावर मारून घेतले. विचारलं, "पण देवा, हे व्हायलाच हवं होतं काय?"

ख्रिस्त बोलला, "वादळात एका चर्चच्या मनोऱ्यावर वीज पडली. ईश्वराची इच्छा. जाब द्यायला तो बांधलेला नाही. ह्या वादळानं तुझ्या शेजाऱ्याचं नुकसान झालं. खुश होऊन खुद्द तूच माझे आभार मानायला आला होतास. आणि आता तुझंच नुकसान झाल्यावर शिव्या द्यायला धावलास – काय म्हणावं तुला कॅमिलो?"

जोरजोरानं मान हलवीत पाद्री ओरडला, "नाही देवा, हे माझं नुकसान नाही. नुकसान तुझ्या चर्चचं. देवाच्या मंदिराचं."

"देवाचं मंदीर? बेटा, ते चिरंतन आहे, अनादिअनंत आहे. उभ्या सृष्टीला उद्या आग लागून ती वेचीराख झाली तरी देवाच्या मंदिराला तडाही जाणार नाही. कॅमिलो, कुठंतरी ही वीज पडणारच होती. ती तुझ्या चर्चच्या मनोऱ्यावर पडली. याहून अधिक अर्थ ह्या घटनेला नाही. कोणी तसा काढूही नये."

पाद्री इकडे ख्रिस्ताशी बोलत होता खरा, पण त्याचं सगळं लक्ष लागलं होतं तिकडे विजेच्या धक्क्यानं जमीनदोस्त

झालेल्या मनोऱ्याकडे. म्हणूनच खिस्ताचं बोलणं वाजवी असूनहि त्याला पटत नव्हतं. एखाद्या हट्टी मुलासारखा तो वाद घालत राहिला. "तरीसुद्धा ही वीज जरा बाजूला पडू शकली असती.. नक्कीच."

आपल्या भक्ताच्या ह्या पोरकट वृत्तीची खिस्ताला कीव आली. तो समजूत घालू लागला. "बेटा, तू आधी शांत हो! मी काय सांगतो याचा थंड डोक्यानं विचार कर. विधात्यानं ही सृष्टी निर्माण केली. तिचा व्यवहार सुसंबद्ध अन् सुसंगत प्रकारे चालावा म्हणून स्वयंभू, स्वाभाविक अशी कार्ययंत्रणा त्यानं घालून दिली. येथील हरएक चराचर वस्तू ह्या यंत्रणेचा अविभाज्य घटक आहे आणि नियतीच्या कार्यकारणभावानं, प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणं, तो उभ्या वस्तुमात्राशी जखडलेला आहे. इथं प्रत्येक घटनेला अर्थ असतो, हेतु असतो. विधिलिखित असतं ते. घडणारच, घडलं पाहिजे. तसं झालं नाही तर नियतीचा स्वाभाविक ताल न् तोल जाईल. सृष्टीच्या संसाराची संगती बिघडेल. नाही कॅमिलो, विधाता कधीहि चुकत नाही. त्याचं गणित नेहमीच बरोबर असतं. चुका माणसाच्या हातून घडतात. आता हाच मनोरा चार हात बाजूला बांधला असता. . . . ."

डॉन कॅमिलोनं देवाला इथं अडवलं. सांगितलं, "बरोबर ह्याच ठिकाणी चर्चच्या मनोऱ्यावर वीज पडणार हे विधिलिखित होतं देवा—तुझ्या परमेश्वराची इच्छा! ती खरी व्हायलाच हवी होती. तेव्हा चर्चचा मनोरा आहे तिथंच बांधायला हवा होता. चार हातसुद्धा तो बाजूला घेता आला नसता."

खिस्तानं तिकडे लक्ष दिलं नाही, "होय, मनोरा चार हात बाजूला बांधता आला असता—पण मग माणसाकडून ईश्वरी इच्छेची अजाणता अवज्ञा झाली असती. ईश्वराला हे बिल्कुल मंजूर नाही...."

"स्वच्छच सांग ना की तुझ्या ह्या सृष्टीत माणसाला कसलंच स्वातंत्र्य नाही." पाद्र्यानं चिडून म्हटलं.

तरीहि खिस्त रागवला नाही. त्याचा आवाज शांतच होता, "बेटा, हे मी सांगायला हवं असं नाही. खुद्द माणूसच जाणून आहे. राग, लोभ, द्वेष, विषयवासना इत्यादि कारणांनी कितीही भरकटला तरी अंतर्यामी तो ही पक्की खूणगांठ बांधून आहे. ईश्वर फक्त वाटाड्या. मार्ग दाखविण्याचं काम त्याचं. त्या मार्गानं जाणं न जाणं माणसाच्या मर्जीचा प्रश्न आहे. चुकीच्या मार्गानंही जाण्याची सवलत ईश्वरानं त्याला दिली आहे, विसरू नकोस. पण आत्म्याला सद्‌गति हवी असेल तर आपल्या कृत्यांबद्दल त्याला जाणीव व्हायला हवी. पापांचा पश्चात्ताप व्हायला हवा. ."

कॅमिलोनं एक दीर्घ निःश्वास सोडला. आणि जड अंतःकरणानं देवाचा निरोप घेतला, "देवा, आभारी आहे. उपदेशाबद्दल. पण सांगून ठेवतो तुझ्या कृपेनं हा मनोरा पुन्हा उभा राहिला तर त्याच्यावर वीज पडणार नाही अशी व्यवस्था मी करणार आहे. होय, तेच बरं. . . . . . ."

"ईश्वराची इच्छा असली तर तसंही होईल." खिस्तानं हंसत आशीर्वाद दिला.

★★

**पहाटे** उगवतीला तांबडं फुटलं होतं. दिशा धुक्यात उठत होत्या. पाऊस कोसळतच होता. तरीहि पाद्री धापा टाकीत चर्चच्या छप्परावर चढला. झालेलं नुकसान जातीनं बघू लागला. अंदाज घेत फिरू लागला.

एव्हाना चर्चवर वीज पडल्याची बातमी गावात झालीच होती. तो चमत्कार बघायला तशा पावसातसुद्धा माणसे धावली होती. चर्चच्या आवारात जाम गर्दी झाली. माणसं नुसतीच उभी होती. चूपचाप, आवाज नाही. डोळे खिळून राहिलेत, वाचा बसलीय् अशा विमनस्क स्थितीत. आकाशांतील बापाची करुणा भाकत.

इतक्यात कॉम्रेड पेपॉनचं टोळकं आवारात घुसलं. पेपॉन आघाडीवर. दोन्ही हातांनी गर्दीला बाजूला सारीत हा पुढं झाला. खाली कोसळलेल्या मनोऱ्याकडे असा न् तसा बराच वेळ बघत राहिला. शोध आणि वेध घेत असावा. काहीतरी सांपडलं असावं. उजवा हात वर आकाशात उडवीत पुढाऱ्याच्या थाटात तो ओरडला, "कॉम्रेड, हा—हा देवाचा कौल आहे. ईश्वर ह्यांच्यावर नाराज आहे. त्याला सुद्धा हे पसंत दिसत नाही."

डॉन कॅमिलो वर छप्परावर उभा होता. निमूट ऐकत होता. तर पेपॉनचं त्याच्याकडे लक्ष गेलं. तो थोडाच गप्प बसणार?

'परकी' विनोद



बोट दाखवून गर्दीचं लक्ष त्यानं पाद्र्याकडे वेधलं, ओरडला. "ह्या पाद्र्याची रे आज का वाचा बसली? तोंडून अक्षरही फुटत नाही. कारण आहे. वीज पडली आहे त्याच्या चर्चवर. तीच आमच्या जनताप्रासादावर पडती तर. . . .तर ह्याचं तोंड असं बेफाम चाललं असतं."

पेपॉनच्या टोळक्यानं एकदम घोषणाच चालू केल्या, "युद्ध-खोरांना चेचून काढा! भांडवलशाही मुर्दाबाद? क्रान्तीचा विजय असो !" वगैरे, वगैरे.

डॉन कॅमिलो संतापनं नुसता जळत होता. पण मोठ्या कष्टानं त्यानं स्वतःला आवरलं. तोंड उघडण्यापूर्वी मनातल्या मनात तो अंक मोजू लागला. बाव्वन्नपर्यंत गेला. आणि मग खिशातून चिरुट काढून शांतपणं त्यानं तो शिलगावला.

"अरे बघा रे!" पेपॉन उभा होताच. तो लोकांना म्हणाला, "कार्थेज जळतंय् आणि हा निरो फिडल वाजवतोय्. "

खरा इतिहास पुस्तकात काही वेगळाच आहे. नाहीतरी त्यात सोईस्करपणं अदलाबदल करण्याचा कम्युनिस्ट पक्षाचा आदेश होताच. पेपॉनचं टोळकं आज भलतंच खुशीत होतं. गांवच्या पाद्र्याला त्यांनीं निरुत्तर केलं होतं. म्हटला तर हा मोठाच पराक्रम होता.

उभ्या दिवसाचा राग डॉन कॅमिलोनं रात्रीं बिचाऱ्या खिस्तावर काढला.

झोपण्यापूर्वी देवाचं दर्शन घेण्याची त्याची पद्धत. दैनंदिन प्रार्थना झाली आणि मग डूक धरल्यासारखा उसळून कॅमिलो खिस्ताला बोलला, "आज काही आपलं डोकं ठिकाणावर नाही देवा. देवाच्या कौलाबद्दल त्या. . .त्या हलकटांची बटबट ऐकून टाळकं फिरलंय्! खरंच सांगतो, सृष्टीच्या त्या नियमाची स्वाभाविक संगती बिघडली असं स्वप्नातही कधी वाटलं नव्हतं मला. पण दिवसभर गांवात चाललेलं तें परखड पाखंड ऐकून मात्र वाटूं लागलंय्. . . . .वाटू लागलंय् की ही वीज ह्यांच्या त्या जनताप्रासादावरच पडायला हवी होती. तेच योग्य होतं, न्यायाचं होतं. देवा तुझा ईश्वर जर जागा असला आणि त्याला माझ्या सारखे काम असलेच तर तो स्वस्थ नाही बसणार, त्याला कोप येईल. कोपल्याशिवाय रहाणार नाही तो. . .ह्यांच्यावर. . . ह्या पाखंड्यांवर. . . . . . . . . . . ."

असं काही बाही बडबडत पाद्री आवेशानं चर्चमधून बाहेर पडला. त्याची रहाण्याची जागा जवळच चर्चला लागून होती. पण रात्रीची वेळ, अशात ह्याचं डोकं फिरलेलं. तो सरळ घरीच पोचेल याचा नेम नव्हता.



**कार्कून !**

**कार्कूना कार्कूना भागलास का**
**लोकलच्या गर्दीत झोपलास का**
**लोकलच्या गर्दीत श्वासबंदी**
**मामाच्या चाळींत हवाबंदी**
**मामाच्या चाळींत येऊन जा**
**चहा–पाव खाऊन जा**
**मामाची पोर गेली तोऱ्यानं**
**तिलाच नेली पोरानं**
**पोरांच्या हातची सुटली**
**पोलिसांच्या हातीं लागली**
**शेजाऱ्यांनी पाहिली**
**चाळींत बाँब ठोकली**

——ह. शि. खरात

तेव्हा पाऊस झिम् झिम् पडत होता. मध्यरात्रीला तो वाढतच गेला. एकच्या मानानं आधल्या रात्रीसारखं जोराचं वादळ सुरू झालं. दोन वाजता केव्हढ्यातरी कडाडून वीज कोसळली. नुसत्या आवाजानंच उभं गांव गदगदून जागं झालं. सव्वा दोनला जिकडेतिकडे एकच हाकाटी उठली. जनता प्रासादावर वीज पडली होती. इमारतीला आग लागली होती.

डॉन कॅमिलो पोहचतो तोवर इमारतीपाशी प्रचंड गर्दी जमली होती. अख्खं गांव लोटलं होतं. पेपॉनची लोकं आग विझवण्यात गुंतली होती. ही जीवावर उदार होऊन खपत होती. म्हणून तर आग आटोक्यात आली होती. मात्र जनताप्रासादाचा वराच भाग जमिनीला मिळाला होता. वरचं छप्पर विल्कुल उडालं होतं. दगडी खांब आणि काही भिंती बोडक्या उभ्या होत्या. धूर. . . धूर आणि काजळी.

वाटावं सहज, पण मुद्दामच पाद्री पेपॉनच्या पुढ्यात जाऊन उभा राहिला. एक हात डोळ्यावर घेऊन जळत्या इमारतीकडे कौतुकानं बघत तो म्हणाला, "छान, कसं चोख काम बजावलंय् विजेनं. म्हणजे तिलासुद्धां खरं नि खोटयाची चाड दिसतेय्."

पेपॉन गर्रकन् त्याच्याकडे वळला.

"चिरूट हवाय् ?" कॅमिलोनं त्याला विचारलं, "अर्धा–"

"नको. नुसताच धूर काढणं मला आवडत नाही." पेपॉननं जाब केला.

"तेही खरंच ! आधीच खूप धूर झालाय् इथं. तुझा, म्हणजे तुझ्या जनतेचा प्रासादच पेटलाय रे ! वाईट झालं ! पण चिरूट नाकारून माझी मात्र तूं अडचण केलीयस फुकट. म्हणजे मनात असूनही तुला चिडवता येत नाही मला की. . कार्येज जळतंय् आणि हा निरो फिडल वाजवतोय्. . . जाऊ दे ! आमचं नशीव ! फक्त एक सूचना. तुला कोणी पढवला मला ठाऊक नाही. पण तुझी माहिती मला चुकीची वाटते. कार्येज नव्हे, रोमरोम जळत होतं. राहिलं तर ठेव ध्यानात. उपयोग होईल पार्टीच्या मिटिंग्सना."

"रोमच ना ? राहील ध्यानात–" पेपॉन उपरोधानं म्हणाला, "मला वाटतं सगळे पाद्रीही तेव्हा जळून मेले असतील !"

कॅमिलोनं नकारार्थी मान हलवली. आणि आवाज चढवून गंभीरपणं सांगितलं, "बाबारे, ईश्वराच्या सहनशीलतेलाही अन्त आहे. भलत्याच इरेला पडून त्याचा कोप ओढवून घेऊ नकोस. ह्या आजच्या अनुभवानं आता शहाणा हो ! मला विचारशील तर हा सगळा सकाळचा तुमच्या पाखंडी अन् हलकट बोलण्याचा परिणाम . . ."

कॉम्रेड पेपॉन खवळून त्याच्या अंगावर धांवला.

पाद्री तितकाच खट. छाती पुढं काढून ताठ उभा राहिला. बोलला, "गुरगुरायला तूं अस्वल नाहीस. ते असतं तिकडे रशियात. तर मतलब, ह्यापुढं शहाणपणानं वागणार असलास तर मदत मिळवून देतो— अमेरिकेकडून."

पेपॉन आणिकच भडकला. डोळे वटारून ओरडला,

"आग लाव त्या पैशाना. गांव आहे समर्थ–"

"छान. . . ! माझंही काम झालं. जनताप्रासादाच्या दुरुस्तीबरोबर माझ्या चर्चचा मनोरादेखील उभा राहील. एका दगडात दोन पक्षी. कौन्सिलकडे मागणी करताना हे मनोऱ्याचं मात्र विसरूं नकोस. . ."

"मढयाला सांग माझ्या." पेपॉन बोलला, "कां ? तुझ्या अमेरिकेला काय भीक लागली ? कॅमिलो, जनताप्रासाद ही सार्वजनिक इमारत आहे. चर्च तुझी खाजगी मालमत्ता. पण तुला पाद्र्याला हे बोलणं नाही कळणार."

डॉन कॅमिलोनं चिरूट शिलगावला. धूर सोडत मोठयाच विचारात गढून गेल्यासारखा एक एक वाक्य तो बोलूं लागला. म्हटलं तर आपल्याशीच, म्हटलं तर सगळ्यांना उद्देशून. नाहीतरी नाटकीच तो. "विचार करतोय् मी. ह्या विजेतही डावं-उजवं आहे की काय ? काल तिकडे देवाच्या चर्चवर वीज पडली. आज इथं ह्या जनताप्रासादावर. कालसुद्धां कडाड् आवाज झाला. पण हा आजचा आवाज भलताच मोठा– विजेचा इतका प्रचंड आवाज आपण तरी ऐकला नव्हता. तसं म्हटलं तर नुकसानसुद्धा चर्चपेक्षा इथंच खूप झालं. नाही म्हणजे शास्त्रीय दृष्टया विचार करण्यासारखा हा मुद्दा आहे. निदान पोलिसांनी तरी ह्याची दखल घ्यायला हवी."

"तूं तुझ्या पंचायती कर–" पेपॉननं दम दिला.

"त्याच करतोय्. काय, चर्चचा मनोरा उभा झालाच पाहिजे !" पाद्र्यानं उलट धमकी दिली.

कॉम्रेड पेपॉन दांतओठ खात त्याच्याकडे पहात राहिला. त्याच्या डोळ्यात खून होता.

पण डॉन कॅमिलो कसचा बधतो ! तो तसाच शांतपणं उभा होता. तोंडात चिरूट. मान ताठ. नजर बेरकी, अधिकच वाचाळ. म्हणजे सैतानसुद्धा ह्याला विचकला असता.

कम्युनिस्ट असला तरी पेपॉन अखेर माणूसच होता. त्याचा निरुपाय झाला. घशात शिशाचा गोळा अडकल्यासारखा जड आवाजात तो बोलला, "ठीक आहे, पण एक दिवस आमचाही येईल. तेव्हा बरोबर बघून घेईन. . ."

डॉन कॅमिलो मग तिथं थांबला नाही. त्यानं तडक घरचा रस्ता धरला. अजून रात्र बरीच उरली होती. घरी जाऊन तो मस्त ताणून देणार होता.

पण ख्रिस्त आपली वाट पहात असणार हे त्याला ठाऊक होतं.

चर्चमध्ये त्या अंधुक काळोखात पाद्र्याला समोर बघून त्याचा देव आज उपहासानं बोलला, "आभार मानायला आला असशील. . . जनताप्रासादावर वीज पडली म्हणून. . ."

"नाही," कॅमिलोची मान खाली होती. आवाज अपराधी होता. एका दरिद्री पाद्र्याच्या इच्छेवरून गांवातलं एखाद भिक्कार खोपाट पाडण्यासाठी सर्वशक्तिमान परमेश्वर पंचमहाभूतांना पाचारण करणार नाहीं हे मला ठाऊक आहे देवा."

"बरोबर आहे. वादळाचा फायदा घेऊन त्या भिक्कार खोपटावर बॉम्ब टाकण्याचा गाढवपणा परमेश्वर करणार नाही. इतका दरिद्री विचार फक्त गांवठी पाद्र्याच्या बेकार टाळक्यातच संभवतो."

डॉन कमिलोनं ख्रिस्ताच्या पायाला घट्ट मिठी मारली. डोकं टेकून सद्गदित वाणीनं तो सांगू लागला, " देवा, क्षमा कर ! गुन्हा केला. त्या ईश्वराची कृपा म्हणून निभावलो. माझ्या पापाचं पुण्य झालं. काय सांगू ? कोणत्या तोंडानं ? अंगात सैतानच संचारला असावा. त्या भरात जनताप्रासादावर मी बॉम्ब टाकला. एक मात्र नक्की ! तो जर टाकला नसता तर ह्या इमारतीच्या तळघरात गुप्तपणं साठा करून ठेवलेल्या दारूगोळ्याचा स्फोट झाला नसता. गांवाला तो नेहमीच धोका राहिला असता. गांव वांचलं देवा. माझ्या पापामुळं हे केव्हढं मोठं कार्य झालं आहे, शिवाय. . . शिवाय तुझ्या चर्चच्या मनोऱ्याचीही व्यवस्था झाली . . . "

ख्रिस्तानं विचारलं, "आपण योग्य गोष्ट केली अशी खात्री आहे तुला ?"

"खात्री नाही. ईश्वरानं माणसाला खऱ्या किंवा खोट्या मार्गानं जाण्याचंच स्वातंत्र्य दिलंय्. माझा मार्ग खोटा होता, चुकीचा होता. कबूल. वाटल्यास त्याबद्दल मी पश्चात्ताप करीन."

"म्हणजे ? झाला नाहीच ?"

"नाही देवा." कॅमिलो पुटपुटला, "इतक्यातच नाही सांगता येणार. तूर्त मुदत वाढवून मिळावी असा अर्ज आहे माझा."

ख्रिस्तानं फक्त उसासा सोडला.

तसा डॉन कॅमिलो घराकडे वळला. बिछान्यावर अंग टाकलं अणि क्षणातच तो डारडूर घोरू लागला. गेल्या कित्येक दिवसात अशी झोप त्याला लागली नव्हती. चर्चचा मनोरा सोन्याचा झालेला त्यानं स्वप्नात पाहिला. मग जाग आली आणि ह्या सोनेरी स्वप्नाचा विचार करीत तो बिछान्यावर पडून राहिला. पण मग एकदम त्याला आठवण झाली. स्वप्नात एक महत्वाची गोष्ट पाद्र्याला दिसली नव्हती. ती इतकी महत्वाची होती की ती बघण्यासाठी तो परत झोपी गेला. आणि. . . आणि. . .

आताच्या स्वप्नात मात्र सोन्याच्या मनोऱ्यावर डॉन कॅमिलोला विज-निवारक यंत्र बसविलेलं दिसत होतं. •••








## पंपू, झंपू, रिमी,

# लॉजिक नि टाईट पँट

**लॉजिकच्या शिकवणीच्या बदल्यात प्रेम !! इल्लॉजिकल !! अखेर लॅजिकने आणि त्याने टाकून दिलेल्या टाईट पॅण्टनेच त्याला बरेच काही शिकवले–जन्मभर पुरेल असे—**



**पंपू** रिमी चिटणीसच्या प्रेमात पडला होता. एरव्ही कुणाच्या प्रेमात तो सापडला असता तर मला त्याचं काही वाटलं नसतं. पण रिमीच्या प्रेमात तो यशस्वी व्हावा असं मला मुळीच वाटत नव्हतं. कारण उघडच होतं. रिमीवर माझंसुद्धा मन जडलं होतं. काय वाटेल ते करून पंपूची आपल्या मार्गातली व्याद दूर कशी करायची याच्याच विचारात मी कित्येक दिवस झोपेशिवाय काढले होते.

एक दिवस भल्या पहाटे डोक्यात लख्ख प्रकाश पडला नि. बस्स्. आता झालंच आपलं काम फत्ते. बेटा रिमीवर... माझ्या रिमीवर प्रेम करतो काय ?

माझ्याकडे एक ड्रेन पाईपची पँट होती. जेमतेम एक दिवस मी ती कॉलेजात घालून गेलो असेन. त्या दिवशीचा माझा अवतार पाहून रिमी खो खो करून हसत सुटली (याचं मला काही वाटलं नाही. हंसणाराचं तोंड थोडंच धरता येतं ?) नि हसता हसता तिनं आपलं डोकं चक्क पंपूच्या खांद्यावर टेकलं. त्या दिवसापासनं मी ती पॅट ट्रंकेत ठेवून दिली नि लग्न करायचंच तर ते रिमीशिवाय कुणाशी नाही असं मी मन तल्या मनात वडलांना कळवूनहि टाकलं.

पण हे जमायचं कसं ?

पंपूच नुसता रिमीच्या प्रेमात पडला असता तर प्रकरण एवढं कठीण वाटलं







अनुक्रमणिका

नसतं. पण तीहि त्याच्या प्रेमात पडली होती त्याचं काय ? पंपूत तिनं एवढं काय पाहिलं होतं कोण जाणे ! पंपू— एड-वंव्या... अँहॅरे... कुठे पंपू नि कुठं रिमी... दोघांचा फोटो काढला असता तर एकाच फोटोत निगेटिव्ह पॉझिटिव्ह दिसल्या असत्या.

पण म्हणतात ना दैवात लिहिलेलं असेल तसंच व्हायचं. परमेश्वर आपल्याला जन्माला घालतो तेव्हा आपल्या वायकोलाहि तो कुठंना कुठं जन्माला घालतच असतो. मी जन्माला आल्याच्या आसपास रिमी जन्माला आली होती ती पंपूसाठी नव्हे.

ज्या संधीची इतके दिवस अगदी डोळ्यात पाणी आणून वाट बघत होतो ती संधी अखेर आपल्या आपणहूनच उंच टाचांचे बूट घालून माझ्या दारी आली. संधी आली. रिमी नव्हे. संधी म्हणजे पंपू. तो आला नि म्हणाला, तू ती ड्रेन पाईपची पँट शिवली होतीस ती कुठाय् रे ?

"आहे, का ?"

"वापरत नाहीस ना तू ?"

मला रिमीच्या खो खो हसण्याचा आवाज ऐकू आला नि पाठोपाठ तिनं आपल डोकं पंपूच्या खांद्यावर टेकल्याचं भयानक दृश्य दिसले.

"मला देशील का थोडे दिवस वापरायला? रिमी म्हणते, साखरपुड्याच्या दिवशी मी तसलीच पँट घातली पाहिजे.

"मग शिवून घे की."

"च्यायला, तेवढं असतं तर मग तुझ्या-कडे कशाला असतो भीक मागायला ? पैशाची कडकी म्हणून तर..."

"मग लग्न कसं करणार ?"

"दोन्ही मांडवांचा खर्च रिमीच करणार आहे."

"हं."

"मग देतोस का ?"

त्या क्षणी पहाटे डोक्यात पडलेला लख्ख प्रकाश मला पुन्हा दिसू लागला नि मी बाबूराव पेंढारकरांसारखा किंवा प्राण-सारखा खुनशीपणानं हंसलो.

"हंसतोस काय ?"

"मग काय रडूं ?"

"नाही, पण..."

"तुला पँट हवीय् ना ?"

"हो."

"मग मला असंच हंसत राहू दे."

"झंप्या, तुझं डोसकच वटवाघळासारखं उलटं."

"हॅं हॅं हॅं हॅं .... हॅं हॅं हॅं हॅं ... पंप्या लेका तू एक नंबरचा गाढव आहेस."

"आता हे तू कशाला सांगायला हवंस खास."

"का रिमीन आधीच सांगून टाकलंय् वाटतं ?"

"तुझ्याशी दोस्ती जमली त्या दिवशीच सगळ्या जगाला कळून चुकलंय् ते !"

"असं काय ? देत नाही जा पँट. पाहूं कसा साखरपुडा करतोस ते."

"नाही तर नाही, पँटशिवाय करीन. झंप्या, या जगात कुणाचं कुणावाचून अडत नाही बघ."

"पंप्या, पँट देतो पण एका अटीवर..."

"कसली ?"

"रिमीला यंदा लॉजिक मी शिकवीन."

"छे,छे, तिला शिकवणी नाही ठेवायची."

"फुकट शिकवीन."

"तिलाच विचार बुवा."

"ती यंदा तरी इंटर पास व्हावी असं वाटतं ना तुला ?"

"पण पँटचा नि याचा काय संबंध ?"

"ते लॉजिक तुला नाही कळायचं. रिमीला सांगेन मी."

"छॅं...हे नाही जमायचं."

"नाही तर नाही. नाही जमलं तर पँट नाही."

"अरे पण का.... वा.... का...."

"असा कावळ्यासारखा ओरडू नकोस. तुला माझी पँट हवी असली तर माझी ही अट तुला मानायलाच हवी."

"बरं, आधी पँट तर दे."

पँट ट्रंकेतून काढता काढतां मी एडवर्ड जी रॉबिन्सनसारखा हंसलो.

"मग आज संध्याकाळपासून यायला सांग तिला. परीक्षा जवळ येत चाललेय्. इंटर नापास वहिनी आपल्याला नाही चालायची."

टेबलावर पडलेल्या फ्री प्रेसच्या अंकात पंपूनं पँट गुंडाळली नि हॅं हॅं हॅं करीत तो निघून गेला.

* *

**पंपूनं** जाऊन तिला काय सांगितलं कुणास ठाऊक पण दुसऱ्याच दिवशी संध्या-काळी ती लॉजिकचं पुस्तक घेऊन माझ्या खोलीवर आली. तिला आलेली पाहिली नि उन्हात पडलेल्या आईस्क्रीमसारखा मी पाणी पाणी होत गेलो.

"येऊ का ?"

"अं... कोण ?... रिमी..."

"लॉजिक शिकविणार आहेस ना तू मला ?"

"नाही...म्हणजे त्याचं काय आहे... मी पंप्याला आपलं सहज...."

"बसू का ?"

"अं... बस ना.

"हं, हे घे लॉजिकचं पुस्तक. शिकव."

"पण थोडा वेळ आधी बोलत बसूं की."

"नको रे, परीक्षा जवळ येत चाललीय. ऑत्ता बोलायला वेळ नाही मलॉऽ."

"पण पहिल्यांदाच माझ्याकडे आली आहेस तूं. चहा तरी घेऊ की...."

"तूं करणार चहा ?"

"नाही, मागवतो खालनं घेणार असलीस तर."

"नको, मी आत्ताच घेऊन आलेय् पंप्याबरोबर हं, शिकवतोस ना ?"

"हो...हो... कुठपर्यंत तयारी आहे तुझी?"

"ए, लेट अस बिगिन फ्रॉम दि बिगिनिंग रे."

"बरं... बरं... बिगिनिंगपासून घेऊं."

"शिकव तर. परीक्षा सारखी जवळ जवळ येत चाललीय्. तुझी वैनी इंटर पास व्हायला हवी ना ?"

"हं, तर बिगिनिगपासून..."

"कित्ती रे वेळ फुकट घालवतोस तूं. कर ना सुरवात शिकवॉयला."

"हं, तर लॉजिक म्हणजे काय ते आपण प्रथम पाहूं."

"अय्या, कित्ती मस्त शिकवतोस रे तूं लॉजिक."

सदानन्द रेगे



अनुक्रमणिका

"ए, आता थट्टा वस्स् झाली हं. परीक्षा सारखी जवळ जवळ येतेय् पंपूसारखी."

"अय्या ऽऽऽ कित्ती ग्रँड विनोद करतोस तूं."

"आवडतो का मी तुला ?"

"म्हंजे काय प्रश्न आहे ?"

"खरंच ?"

"तुझ्या गळयाशपथ. कित्ती आवडतोस तूं मला. त्या उडपीच्या हॉटेलातील मसाला डोश्यापेक्षाहि तूं मला आवडतोस."

"रिमे. . . "

"झंप्या..."

"हं, तर लॉजिक म्हणजे काय ते पहाणार होतो आपण."

"हो. तर लॉजिक. म्हणजे काय आहे ? ते एक शास्त्र आहे."

"थांब हा, मी लिहून घेते."

बोलता बोलता तिनं ब्लाऊझमध्ये फौंटनपेन ठेवतात तिथनं एक कागदाची घडी काढली.

"हं, काय म्हणालात सर ?"

"रिमे, चावटपणा नाही हा करायचा. घे लिहून." तिनं कागदावर लिहिलं: रिमे, चावटपणा नाही हा करायचा.

"हे काय लिहिलंस ?"

"तूं लिहून घ्यायला सांगितलंस ते."

"खोडून टाक ते."

"खोडलं."

"हं, लिही आत्तां—लॉजिक हे एक शास्त्र आहे."

"पण हे सगळं येणार का रे परीक्षेला ?"

"लिहून घे म्हणून सांगितलं ना ?"

"वरं बॉबॉ... तूं म्हणतोस तसं करू."

"रिमे, आत्ता अगदी सिरीयस अभ्यासाला लागायचं वरं का. मी सांगतो तेवढं कर. काय बिशाद आहे युनिव्हर्सिटीची तुला नापास करायची ? अन् पास झालीस तर फक्कडसा सिनेमा दाखवीन तुला."

"पण पंपूला विचारल्याशिवाय कशी येऊ मी तुझ्यावरोबर ?"

"तुझं आपलं सारखं पंपू... पंपू... पंपू..."

"मग काय करू रे ?"

"दुसरा विषयच नाही का तुला ? पंपूची तू गुलाम आहेस वाटतं ?"

"हो, पण तुझी तरी कुठं आहे ?"

"हं... तर मी काय सांगत होतो ?"

"लॉजिक हे एक शास्त्र आहे."

"अंहं..."

"मग ?"

"ते विचाराचं शास्त्र आहे."

"अय्या..."

"अय्या काय ?"

"तूं किती मला शिकवतोस रे ? तूच का घेत नाहीस आमची लेक्चर्स ?"

"मला लेक्चरर नाही व्हायचंय. मी आणखी कुणी तरी मोठ्ठा होणार आहे."

"कित्ती ग्रँड."

"तर लॉजिक हे विचार करण्याचं शास्त्र आहे. लॉजिक शिकल्याने विचार कसा करावा नि कसा करू नये हे समजतं. सर्वसाधारण माणूस विचार करतो पण त्याच्या विचाराला शास्त्राची बैठक नसते. त्याच्या विचाराला पद्धत नसते...."

"हे सगळं लिहून घ्यायला हवं का रे ?"

"वाटलं तर घे. . "

"मग तूंच का नाही ठेवत माझ्यासाठी लिहून ?"

"परीक्षेत कोण लिहिणार आहे ? तूं का मी ?"

"हो, तेहि खरंच."

"पाहिलंस ? विचाराला शास्त्रशुद्ध आधार नसला म्हणजे असं होतं. सर्वसामान्य माणसाचंहि—"

"आलं लक्ष्यात—म्हणजे मी सर्वसामान्य असंच म्हणायचंय् ना तुला ?"

बोलतां बोलतां रिमी ओक्सावोक्शी रडूं लागली. मी तारेवरचा टुवाल काढला नि तिचे डोळे पुसले. तिचे डोळे पुसताना मलाहि रडूं येत होतं, पण वरंहि वाटत होतं. वाटत होतं हिन असंच रडत रहावं कल्पांतापर्यंत नि मी टुवाल घेऊन तिच्या बाजूला उभं असावं.

मग टुवाल पुन्हा तारेवर टाकून मी तिच्यापाशी आलो नि म्हणालो, "नो मोअर क्राईंग, वरं का ?"

मग ती खुदकन् हंसली. मग मीहि खुदकन् हंसलो. मग ती खो खो हंसूं लागली. मग मी मात्र गंभीर झालो.

"आता आपण विचारात विसंगति कशी निर्माण होते ते पाहू."

"अय्या कित्ती छान. . . फारच मस्त."

'या विसंगतीला इंग्रजी भाषेत Fallacy म्हणतात. आत्तां तुला मी ज्या Fallacy विषयी सांगणार आहे तिचं नांव आहे Dicto Simpliciter....

"सुंदर."

"आत्ता हेच विधान घे. व्यायाम करण्याने माणसाचे आरोग्य उत्तम रहाते."

"कित्ती सोपं करून सांगतोस तूं रे !"

"याचाच अर्थ असा की, ज्या अर्थी व्यायाम करणे आरोग्याच्या दृष्टीने हितावह असते त्या अर्थी सर्वच माणसांनी व्यायाम हा करायलाच हवा."

"हो ना. काय चुकलं त्यात ?"

"पण एखाद्याला हृदयाचा विकार किंवा ज्याला इंग्रजींत हार्ट डिसीझ म्हणतात तो असला तर ?"

"खरंच की !"

"म्हणजे व्यायाम हा सर्वांनाच हितावह असतो हें विधान पूर्णांशानं खरं नव्हे."

"बरोबर आहे."

"अशी पूर्णांशाने बरोबर नसणारी विधाने केल्यास आपण—"

" Dicto Simpliciter करतो."

"अहं, Dicto Simpliciter चीं फॅलसी करतो."

"म्हणजे मलॉ चक्क लॉजिक यायला लागलं की !"

"थांब, थांब, अशी उतावीळ होऊं नकोस अजून दिल्ली तो बहोत दूर है."

मध्येच ती हंसली.

"हंसलीस का ?"

"कॉंही नॉंही."

"तरी पण. . . "

"तूं आत्तां हिंदी बोलत होतास ना ते पाहून मला मास्टर भगवानची नि जॉनी वॉकरची आठवण झाली. पाहिलंस का रे तूं ते पिक्चर."

"परीक्षा जवळ जवळ येत चाललेय् म्हटलं बाईसाहेब."

"हो की. . . अगदी Dicto simpliciter."

"आत्तां आपण Hasty Generalisation म्हणजे काय ते पाहं. तुला तामीळ येत नाही. पंप्यालाहि येत नाही. नि मलाहि येत नाही. आत्तां एवढ्यावरूनच मी जर सर्व सामान्य विधान केलं की, आमच्या कॉलेजांत कुणालाच तामीळ येत नाही; तर ते बरोबर होईल का ?"

"पण आपल्या कॉलेज त कितीतरी मद्रासी पोरं आहेत की."

"हो ना ? आहेत ना ? म्हणजे केवळ आपल्या तिघावरूनच आपण जर सर्वसाधारण निष्कर्ष काढला तर. . ."

"हा, पण निष्क... निष्कर्ष म्हणजे काय रे ?"

"निष्कर्ष म्हणजे निष्कर्ष. . .निष्कर्ष म्हणजे...म्हणजे...नकुलजन्...'"

"हां... हां... आत्तां आलं लक्षांत."

"तर या फॅलसीला काय म्हणतात?"

"Dicto..."

"डोंबलं माझं."

"ए, रागवूं नकोस रे. मग मला लॉजिक कोण शिकवणॉर ?"

"याला म्हणतात Hasty Generalisation"

"संपल्या का सगळ्या फॅलसी ? कित्ती गंमत असते नाही ?"

"आत्तां समज तूं नि मी पिकनीकला जायचं ठरविलं."

"पण आधी पंपूला विचारावं लागेल, बरं का ?"

"विचारू ग. त्याची काय हिंमत लागलेय् नाहीं म्हणायची '. पण समजा. . . "

"वरं, समजा. . . "

"पंपू आपल्या बरोबर आला म्हणजे प्रत्येक वेळी पाऊस पडतो, म्हणून आपण त्याला न्यायचं नाही, असं टरविलं तर ते बरोबर होईल का ?"

"झंप्या, पंपूला हें कळलं तर. . ."

"अग, कल्पना आहे ही. पण असं ठरविलं तर ते बरोबर होईल का ?"

"अर्थातच नाही. अन् तसं असलं तरी मी माझा रेनकोट बरोबर घेऊन येईन."

"या फॅलसीला म्हणतात— "Post Hoc... काय ? Post Hoc..."

"Post Dadar लक्षांत ठेवलं की झालं."

"झाला का तुझा वात्रटपणा सुरू ?

"ए, नको रे रागवूं.आणखी सांग एखादी फॅलसी. मला तर बाई खूप मज्जा वाटायला लागलीय्."

"आत्तां Contradictory Premise म्हणजे काय ते सांगतो."

"किती गंमतीदार आहे नाही लॉजिक हा विषय ?"

"कित्ती मस्त !"

"आत्तां हेंच विधान घे. ईश्वर सारे काही निर्माण करूं शकतो."

"मग काय खोटं आहे ?"

"हो ना, करूं शकतो ना ? मग जो दगड त्यालाच उचलतां येणार नाही असा दगड तो निर्माण करूं शकेल का ?"

"असं कसं ?"

"कां नाही ? तो सारं काही निर्माण करूं शकतो ना ?"

"अय्या, पण ईश्वराचं लॉजिक कच्चं नाही काही माझ्यासारखं."

"म्हणजेच तो तसला दगड निर्माण करूं शकणार नाही. म्हणजेच तो सारं काही निर्माण करूं शकतो हे काही तितकंसं खरं नाही. होय ना ? याला म्हणतात Contradictory Premise".

"संपल्या का Fallacy ?"

"अंहं, हा कधीच न संपणारा विषय आहे."

"मग मी परीक्षेला काय करूं रे ?"

"वरं, आज झाला तेवढा अभ्यास पुरे झाला. दमली असशील तूं."

मला वाटलं खरोखरच थकल्यासारखी होऊन ती माझ्या अगदी जवळ येईल नि निदान माझ्या खांद्यावर तरी डोकं टेकेल.

पण लगबगीनं ती उठली नि साडी चापून चोपवून बनवीत ती म्हणाली, "आत्तां उद्यां येऊ ना ?"

"तुला काय वाटलं, सगळा अभ्यास संपला वाटतं ? रोज यायला हवं तुला इथं."

"ठीक. उद्यां याच वेळेला. टाऽऽटाऽऽ"

"अग पण थांब, मी येतो ना खा लपर्यंत."

पायांत कशावशा चपला अडकवीत मी तिच्याबरोबर बाहेर आलो. नि दाराला कुलू। लावलं. मी कुलूप लावीत होतो तेव्हा ती कठड्याला रेलून उगीचच रस्त्याकडे पहात होती.

जिना उतरतां उतरतां मी मला कळत पण तिला नकळत तिला जवळ जवळ बिलगलोच. पण तीहि तिला कळत नि मला नकळत चपळाईनं दोन पायऱ्या झपाझप उतरली. मनां। होतं, जमल्यास— म्हणजे ती आल्यास— तिला चहाला घेऊन जावं. तेवढ्यात तिचा महवान.

पण खाली येतो तो दाराशीच पंपू उभा.

"काय संपला का अभ्यास ?"

"सुर्वात केलीय् थोडी थोडी."

"यंदा पास व्हायला हवी वरं का, झंप्या."

"होईल रे... सगळं काही होईल."

पण माझं बोलून व्हायच्या आत पंपूनं रिमाचा हात आपल्या हातात घेऊन पुढची वाटहि धरली होती.

"वरं, उद्यां येते रे." जातां जातां मागे वळून रिमा म्हणाली. तेवढंच जरा मनाला बरं वाटलं.

दुसऱ्या दिवशी अगदी वेळेवर ती आली. त्या दिवशी तिला आणखी दोन Fallacies शिकवल्या. "Ad Misericordian" नि "Hypothesis contrary to Fact!" मी बोलत होतो नि तिचं अधूनमधून अय्याऽऽ, मार्व्होऽऽऽ, ग्रंड, कित्ती कित्ती रे


FRANCE-Urs






अनुक्रमणिका

चांगला शिकवतोस तूं. . . चालूंच होतं. Ad Misericordian शिकवताना मी तिला उदाहरण दिलं. समजा, पंप्यानं नोकरीसाठी एके ठिकाणी अर्ज केला आहे. तो मुलाखतीसाठी गेला आहे. कंपनीच्या अधिकाऱ्यानं त्याला विचारलं, तुमची क्वालीफिकेशन्स काय काय ?" अन् पंपू म्हणाला, "रिमा नांवाच्या सुंदर मुलीवर माझं प्रेम आहे. लवकरच आमचा साखरपुडा होणार आहे. मी नोकरीला लागल्यावरच ती माझ्याशी लग्न करणार आहे. म्हणजे विचारल्या गेलेल्या प्रश्नाचा नि पंपूच्या प्रश्नाचा अर्था अर्थी काही संबंध नाही. तर Ad Misericordian ची Fallacy होते. पण एकंदरीत तिला हे उदाहरण आवडलेलं दिसलं नाही.

मग मी दुसऱ्या Fallacy कडे वळलो. समजा, न्यूटनला त्या दुपारी सफरचंदाच्या झाडाखाली झोंपावसं वाटलं नसतं तर गुरुत्वाकर्षणाचा शोध लागला नसता. अर्थातच हे वरपांगी खरं वाटलं. तरी खऱ्या अर्थानं काही हे खरं नाही.

"कसं रे ?"

"अग, त्या दिवशी दुपारी सफरचंद पडतांना त्याला दिसलं तर दुसऱ्या कोणत्या तरी दिवशी दिसलं असतं. अन् न्यूटनला दिसलं नसतं तर दुसऱ्या कुणाला दिसलं असतं. म्हणजेच उशीरा का होईना, पण गुरुत्वाकर्षणाचा शोध हा कधी ना कधी लागलाच असता."

अन् अशीच खूप खूप उदाहरणं मी तिला दिली.

त्या दिवशी तिला पोचवायला म्हणून खालपर्यंत गेलो. पंपू होताच. तिला पहातांच तो म्हणाला, "चल लौकर, पिक्चर गाठायचंय् आपल्याला."

"कोणतं पिक्चर."

"माय फेअर लेडी."

"म्हणजे ते पिग्मॅलियनवर–"

"हो. . . हो . . . तेच . . . "

पिग्मॅलीयन. . . पिग्मॅलीयन . . . म्हणजे मी रिमाला तर्कशास्त्र शिकवतोय् तसाच त्या नाटकांतला नायकहि तिला संस्कृति् शिकवूं पहात होता. . .

रिमाची शिकवणी अशीच काही दिवस चालली. मग अगदी रहावेना तेव्हा मी उघड उघड विषय काढला.

"त्या पंपूत काय पाह्यलंय्स तूं एवढं ?"

"अय्या, म्हंजे ?" तिचे बदामी डोळे ओल्या अल्बुखाराएवढे मोठे झाले.

"म्हंजे... म्हंजे... रिमा..."

"झंप्या, तुला झालंय् तरी काय ?"

"क. . . कसं सांगूं तुला रिमा ?"

"आज अभ्यास नाही का करायचा ?"

"आज अभ्यासाला सुट्टी. आज मला तुला काही सांगायचंय्."

अन् बराच वेळ मी तिच्याकडे नुसता पहातच बसलो.

"सांग ना मग."

"रिमा, मा . . . मा . . . झं तुझ्यावर प्रेम बसलं आहे."

"इश्श. . . "

"इश्श काय ?"

"झंप्या, लेका पंपूला कळलं तर—"

"अजून काही तूं त्याची झाली नाही आहेस."

"गेली कित्येक दिवस एकच विचार मनांत येतोय्. आपला जोडा कसा लक्ष्मी-नारायणासारखा शोभून दिसेल बघ."

"झंप्या. . . झंप्या अरे तुला झालंय् तरी काय ?"

"खरंच."

"काय खरं ?"

"आत्तां म्हटलं ते."

"छट्."

"तुला नाही वाटत तसं ?"

"अजिबात नाही."

"कां ?"

"तुला वाटतं ती एक Fallacy आहे केवळ. या Fallacy ला Hasty Generalisation म्हणतात."

"कसं काय ?"

"एक आठवडाभर तुझ्याकडे लॉजिकला शिकायला आले नि तेवढ्या आधारावर तूं भलताच निष्कर्षहि काढलास. कम्माल आहे तुझी."

"मग काय थोडा झाला हा वेळ ? शितावरून भाताची परीक्षा सहज करतां येते. You don't have to eat a whole cake to know that it's good."

"फॉल्स ॲनालॉजीऽऽऽ मी शीतहि नाही नि केकहि नाहीं."

मग मी बेमालूमपणे पवित्रा बदलला नि तिच्या पायाशी गुडघ्यावर वाकून उभा राहिलों.

"प्रिये, उभ्या पृथ्वीचं राज्य जरी मला मिळालं तरी. . . "

"Ad Misericordian " ती आपल्या हातांतला इवलासा रुमाल ओंठावरून फिरवीत थंडपणे म्हणाली.

आतां मात्र माझा नाईलाज झाला.

मी काहीशा उपहासानं म्हटलं, "लॉजिक चांगलंच कळायला लागलेलं दिसतं तुला !"

"अगदी बरोबर."

"पण कुणाकडून शिकलीस म्हटलं ?"

"प्राध्यापक झंप्याकडून."

"मग काढा तर आमची फी. आम्ही शिकविलं नसतं तर तुम्हाला Fallacies कशाची खातात हे कधीच कळलं नसतं."

"Hypothesis Contrary to Fact!"

"अग अग पण...असा गैरसमज करून घेऊं नकोस. मला म्हणायचं होतं की पुस्तकी ज्ञानानं काही जीवनाचा अनुभव घेतां येत नाही."

"Dicto simpliciter."

एव्हाना माझा जीव अगदीच घामाघूम होऊन गेला होता. पण निर्वाणीचा प्रयत्न करून पहायचं ठरविलं नि ताडकन् उभा राहून मी तिला सरळ सरळ विचारलं, "म्हंजे माझ्या प्रेमाचा स्वीकार नाही करायचा तर तुला ?"

"नाही."

"कां ?"

"कारण पंप्यावर माझं प्रेम आहे म्हणून.'

"पंप्या . . . पंप्या . . . तो उंदीर . . . तो हत्ती . . . तो घोडा . . . तो . . . तो "

"ही कुठली रे फॅलसी ?"

'हिला Pampulita Fallatica म्हणतात'. यावर जी खोखो हंसत सुटली की आतां ही कधीच थांबत नाही या विचारानं मी भयभीत होऊन गेलो. अखेर तिला कोपरापासून नमस्कार करीत मी कसं-बसं म्हटलं, "रिमी. . . रिमे— तूं आता तर्कशास्त्राची विद्यार्थिनी आहेस. डोकं जाग्यावर ठेवून थोडा विचार कर. त्या पंप्यासारख्या काळुंद्रावर कुठं तुझं प्रेम बसलं ? कुठे तूं, कुठं तो? नाही तर माझ्याकडे पहा. पंप्यापेक्षा मी सतरा पटीनं हुशार आहे. चांगला आहे. निदान एक तरी— एक तरी कारण सांग तूं त्याच्यावर प्रेम कां करतेस त्याचं ? शकशील कां सांगूं?"

"अलबत्."

"मग सांग की ?"

"अलीकडे टाईट पँट घालायला लागल्यापासून तो थेट अगदी राजेंद्र-कुमारासारखा दिसतो बघ."

"Pampulita Fallatica" मी किंचाळलो. नि त्याच्यानंतर माझ्या तोंडून शब्द बाहेर पडेनासा झाला. (आधारित)





अनुक्रमणिका











अनुक्रमणिका









# एकेकाची तऱ्हा

—शां. शं. रेगे

हॉस्पिटलमधून प्रयाण करताना तिनें मला एक कसलेसे मासिक भेट म्हणून दिले. त्यावर संत्र्याच्या रसाचे, लोणी पावाचे डाग स्पष्ट दिसत होते....... अशी असतात एकेक माणसे. त्या त्या वेळी आम्हाला चीड येते त्यांची पण नंतर आम्ही सर्व विसरून जातो.

माझ्या पायाचे ऑपरेशन चांगले झाले होतें. पण हाताची बोटे मात्र ठणकत असल्याचे जाणवत होते. मी हात तपासत असताना नर्सने पाहिले आणि नेहमीच्या रूक्ष स्वरात तिने सांगितले कीं गुंगीच्या अंमलातून आता मी हळूहळु शुद्धीवर येत होतो. ऑपरेशन नंतर थिएटरमध्येच सर्जनच्या मुस्कटात भडकवण्याचा पराक्रम मी नुकताच गाजवला होता... आणि ते पुरेसे न वाटून एका नर्सच्या हातालाही मी म्हणे चावलो होतो.

"हे कांहींच नाहीं." ती नर्स म्हणाली, "पुष्कळ रोगी असेच करतात किंवा करू पाहतात..."

"आणि त्यांची भाषा! आपणास आश्चर्य वाटेल. त्यांच्या एकंदर पोशाखावरुन असले घाणेरडे शब्द त्यांना माहीत असतील असे वाटणारही नाही कुणाला! तुमच्या बाबतीत म्हणायचं तर साहेब तुमचे वर्तन फक्त आत्मरक्षणाच्या भावनेनुसारच घडलेले आहे. गुंगीत असताना स्वताचे रक्षण करण्याची तुमची धडपड जणू चालली होती."

"माफ करा, सिस्टर! माझ्या वर्तनाची मलाल ज वाटते. डॉक्टरना मला क्षमा करावयास सांगा."

"ठीक ठीक! तुम्ही मनाला लावून घेऊ नका. आम्हाला सराव आहे असल्या प्रसंगाचा. काही पेशंट्सच्या गोष्टी सांगितल्या तर तुम्ही थक्क व्हाल!"

"गुंगी दिल्यावरही ते असले घाणेरडे बोलतात?"

"ते परत उच्चारणे अशिष्ट ठरेल... आणि व्यावसायिक दृष्ट्या ते ठीकही नव्हे. लोक विचित्र असतात एकंदरीत, होय की नाही?"

"खरोखरच विचित्र."

"उदाहरणार्थ, एका बाईचीच गोष्ट घ्या...."

एकदा एक बाई आमच्या हॉस्पिटलात दाखल झाली होती. (ती नर्स सांगत होती) तिच्या पोटात काहीतरी व्याधि होती आणि तिचे ऑपरेशन करण्याची वेळ नक्की ठरली होती.

ती स्त्री चांगल्या घराण्यातली वाटत होती. दिसायलाही ती सुंदर होती, तरुण होती आणि चांगली पैसेवालीही असावी असे वाटत होते. तिची पहिल्या मजल्यावर एका स्वतंत्र खोलीत व्यवस्था केलेली होती. दररोज तिला येणाऱ्या भेटी, फुलांचे गुच्छ, फळे, पत्रे, मासिके आणि इतर वस्तू पाहून जणू शहरातला प्रत्येक जण तिला ओळखत होता असे वाटत होते.

कांहीं रोगी विचित्र असतात. त्यांची तब्येत संभाळणे महाकठिण असते. पण ही तशी नव्हती. खरे म्हटले तर ती अगदी त्या उलट होती, अत्यंत सोशीक आणि मनमिळाऊ. आम्ही तसे प्रत्येकाकडे नीट लक्ष पुरवतो. ते आमचे कर्तव्यच आहे. कोणी त्याची जाणीव दाखवली तर आम्हाला बरे वाटते. पण त्याबद्दल कोणी आभार व्यक्त करावे अशी खरोखरी आमची मुळीच अपेक्षा नसते.... आठवण तर दूरच राहिली. तर मी काय सांगत होते. हं! ही स्त्री अशी वागत

असे की जणु काय तिला आमची भीति वाटत होती—विशेषतः माझी तरी.

शाळेतली मुले कशी उशीर झाला की, मास्तरला खूष करण्यासाठी कशी फुले अगर एखादे फळ कधीकधी शाळेत येताना आणतात नाही का ? तशी ती वागत असे.

आम्हाला ते विचित्र वाटायचे. आमच्यापैकी कोणी तिच्या खोलीत गेले रे गेले की ती आम्हाला काहीतरी द्यायचीच—एखादे द्राक्ष, सफरचंद किंवा एखादे सुंदर फूल तरी. आमच्या एका नर्सला तिने एका बड्या हॉस्पिटलमध्ये आपल्या वशिल्याने तीनशे रुपयाची नोकरी मिळवून देण्याचे आश्वासन दिले होते. मला तर ती म्हणाली की तू एक स्वतंत्र नर्सिंग होम काढ. . . मी पैशाची व्यवस्था करते. कारण माझ्यावर ती फार खूष होती.

एकदा तर तिने आपला एक सुरेख लाल विलायती लोकरीचा स्वेटर घेण्याचा मला सारखा आग्रह चालवला होता. खरे म्हटले तर मला उगीच ही भेट घ्यायची नव्हती. पण तिच्या आग्रहापुढे माझे चालले नाही.

आमच्या डॉक्टरची ती खाजगी पेशंट होती. ते तिचे फॅमिली डॉक्टरच होते. किती कसबी अन् हुशार आहेत आमचे डॉक्टर. त्यांची फी जबर आहे. नुसते साधे गळू कापायचे असले तर शंभराच्या नोटेशिवाय सुरी लावायचे नाहीत. पण गरिबांसाठी फार केले आहे त्यांनी. तिथे भेदभाव नाही की दिवसरात्रीची पर्वा नाही.

तिच्या ऑपरेशनपूर्वी एक आठवडा ती हॉस्पिटलात दाखल झाली होती. आणि दोनचार दिवसातच सगळ्यांची तिची दोस्ती जमली होती. आमच्या एका महाखट दाईचे आणि तिचे सूत जमलेले पाहून सगळ्यांना आश्चर्य वाटले होते. त्या दाईच्या घरची मोठ्या आस्थेने तिने चौकशी केली होती आणि आपल्या यजमानाचा नुकताच शिवलेला एक कोट (कुठे जरा चुनी पडते म्हणून पसंत नसलेला) तिच्या नवऱ्याला देऊन टाकण्याची तिने तयारी दर्शवली होती. तिच्या मुलांना फळे, तिला काही आणल्यावर उरलेली मोड असे लहानसहान देऊन खूप ठेवली होती त्या पेशंटने.

तिच्या खोलीतली मासिके आणि कादंबऱ्या शंभरानं भरल्या असत्या. तिला वाचनाचा खूप नाद होता आणि आमच्या नर्सेस अधाशीपणे त्या रंगीत चित्रांच्या मासिकांकडे आणि कोऱ्या करकरीत पुस्तकांकडे पाहू लागल्या की ती म्हणायची की जातांना ते सर्व मी तुम्हालाच ठेऊन जाणार आहे.

तिच्याजवळ गडगंज पैसा होता हे उघडच होते. तिच्या गळ्यात चमचम करणारा हिऱ्याचा नेकलेस होता आणि हातात नव्या तासाच्या रत्नजडीत बांगड्या ही. ती म्हणायची की मला ह्या रंगीत रत्नांचा षौक आहे तो त्यांच्या किंमतीसाठी नसून त्यांच्या सप्तरंगी चकाकीसाठी.

तिच्या डाव्या करंगळीत एका गडद नीलमण्याची आंगठी होती ती तिला फारच प्रिय होती. तिच्या जीवनातील काही सुखद घटना त्या नीलमण्याशी निगडित होत्या असे तिने सांगितले होते. शेजारच्या बोटात एका मोठ्या हिऱ्याची आंगठी होती. खास इटलीहून तास कापून कुशल कारागिराकडून ती बनवून आणल्याची हकिगत मोठ्या कौतुकाने ती आम्हा सर्वांना सांगत असे. आम्हाला फार हेवा वाटायचा तिचा. ऑपरेशनच्या आदल्या रात्री आमच्या नेहमीच्या प्रथेप्रमाणे मी तिच्या खोलीत शिरले आणि तिची विचारपूस करून तिला चार धीराचे शब्द बोलले. तेव्हा गहिवरून ती म्हणाली, "सिस्टर, मला तुम्हाला काही द्यावयाचे आहे."

मी म्हटले, "तुमचे मन फारच मोठे आहे. मला वाटते तुम्ही आतापर्यंत मला भरपूर दिले आहे."

पण ती म्हणाली, "माझी एक लहानशी भेट तुम्ही स्वीकाराल तर मला अतिशय बरे वाटेल. स्वीकाराल ना ? नाही म्हणू नका ! शपथ आहे माझी तुम्हाला !"

तिने आपल्या हातातली ती चमचमणारी मोठ्या हिऱ्याची आंगठी काढली आणि माझा हात पकडून माझ्या करंगळीत ती चढवली देखील. मी अगदी हतबुद्ध झाले होते. माझा माझ्या डोळ्यांवर विश्वास बसत नव्हता. कित्येक हजार रुपयांची आंगठी माझ्या बोटात चकाकत होती.

मी म्हणाले, "छे, छे ! भलतेच काय हे ! नको मला ही आंगठी" असे म्हणत असतानासुद्धा मी मनात मात्र अगदी खूप होते. मला हिरा फार आवडत असे. जवाहिऱ्यांच्या दुकानातल्या छोट्या हिऱ्याच्या आंगठ्यांकडे लोभस नजरेने पाहत मी कित्येकदा तासन् तास उभी राहत असे. मला तशी एखादी मिळेल असे स्वप्नातही मला कधी वाटले नव्हते. आणि आज त्यांच्या शतपट किंमतीच्या ह्या चमकत्या हिऱ्याची आंगठी माझ्या बोटावर चढली होती. असली भेट देणारी ही स्त्री उदार म्हणायची, उधळी म्हणायची की खुळी म्हणायची. काहीच सुचत नव्हते मला. माझी विचारशक्ति त्या तेजाने जणू दिपून निकामी ठरली होती.

मी तिला अनेकदा सांगितले–विनवले देखील की, असली ही किंमती भेट मला मुळीच नको म्हणून. पण ती तर हट्टालाच पेटली होती. ती म्हणाली की, हिऱ्यांची तिला पर्वा वाटत नव्हती. आणि त्यापेक्षा माझ्याबद्दल तिला एवढे प्रेम वाटत होते की, ती आंगठी माझ्याकडे राहिली तर तिला अधिक आनंद होणार होता. मी जर आंगठी घेतली नाही तर ती रागावणार होती आणि ती खिडकीतून फेकून देणार होती असेही तिने निग्रहाने सांगितले.

एवढ्या प्रेमळ अकांडतांडवानंतर मला ती आंगठी घ्यावीच लागली.

पण ती जवळ बाळगायची मला भीति वाटत होती. मी मेट्रनकडे गेले आणि ती तिजोरीत ठेवण्यासाठी तिच्या हवाली केली. मेट्रनला माझा हेवा वाटला. मी किती भाग्यवान आहे ह्याचा तिने वारंवार उल्लेख करीत ती आंगठी तिजोरीत ठेवली. त्या रात्री प्रत्येक जणीचे भाग्य उदयाला आले होतेसे दिसले. रात्रपाळीच्या सिस्टरला उबदार फरचा कोट मिळाला होता. एका नर्सला नायलॉन् सिल्कची किंमती साडी मिळाली होती. तिच्यासारखा उदार पेशन्ट हॉस्पिटलात आजपर्यंत कधी आला नव्हता असेच प्रत्येकाचे मत झाले होते. सर्व हॉस्पिटलचे वातावरण त्या रात्री अगदी खुषीने व्यापून गेले होते.



## मीच तो !

**हॉस्पिटलच्या आवारांत एक वयोवृद्ध गृहस्थ बसला होता. तो बराच वेळ तिथे बसला. तिथे काम करणाऱ्या सेवकाच्या ते लक्षांतहि आले. काही वेळाने उठून तो गृहस्थ त्या सेवकापाशी गेला व म्हणाला,**

**'मला गोगटयांना भेटायचंय आता भेटता येईल कां ?'**

**त्या सेवकाने कार्डे पाहिली. गोगटयांचे नांव आढळले. पण भेटण्याची वेळ संपली होती. म्हणून तो म्हणाला,**

**'माफ करा, तुम्हाला आता त्यांना भेटता येणार नाही'.**

**'बरं—मग त्यांची तब्येत कशी आहे ते तरी सांगता का ? प्लीज'**

**पुन्हा त्या सेवकाने गोगटयांचा चार्ट काढून वाचला व म्हणाला,**

**'तब्येत सुधारणेच्या मार्गावर आहे. लवकरच ते खडखडीत बरे होतील.**

**'थँक्यू ! फार बरं वाटलं तुम्ही सांगितल्यामुळे. गेले दहा दिवस मी डॉक्टरांना एक सारखं विचारत होतो. पण डॉक्टरांनी मला रिपोर्ट काही सांगितला नाही. ते म्हणतच होते रिपोर्ट काही सांगता येणार नाही.**

**'म्हणजे ?'**

**'म्हणजे काय ? अहो मीच तो गोगटे. पेशंटचे कपडे उतरवले आणि साध्या पोषाखांत इथे येऊन बसलो होतो.**

---

दुसऱ्या दिवशी सकाळी उजाडताच मी तिच्या खोलीत गेले होते. आदल्या दिवशीचा तिचा उत्साह आणि खुषी मला लोपलेली दिसली. ती भीतीने फटफटीत पडली होती. ऑपरेशनमध्ये आपण मरणार काय असाच प्रश्न ती मला अधुनमधून विचारत होती. खुळी कुठली ! असल्या साध्या ऑपरेशनमध्ये कुणी कधी मरेल का ? आणि आमच्या डॉक्टरसारखे कुशल सर्जन असल्यावर तर मुळीच भीति नको. त्यांच्या हातचा मळ आहे असली ऑपरेशन्स्. डोळे मिटून अंधारात देखील ते सहज सर्व काम बिनचूक करतील एवढी त्यांची ख्याति होती.

तसे हे ऑपरेशन अगदीच साधे नव्हते. पण दिवसातून अशी तीन तीन ऑपरेशन्स् झाली आहेत आमच्या हॉस्पिटलात. मागे युद्धातल्या प्रतिकूल वातावरणात आमच्या डॉक्टरना आघाडीवर खास बोलावून नेले होते तेव्हा चांभाराच्या सराईत निर्विकार वृत्तीने अशी कितीतरी ऑपरेशन्स त्यांनी सहज यशस्वी करून दाखविली होती.

थोडया वेळाने तिला खाली ऑपरेशन थिएटरकडे नेण्यात आले आणि आमच्या डॉक्टरांनी संत्राप्रमाणे झटपट सर्व काम पुरे केल्यानंतर तिला तसेच तत्परतेने वर आपल्या खोलीत आणण्यात आले.

आम्ही आमच्या सर्व पेशन्ट्सची नेहमीच तत्परतेने काळजी घेतो. ते आमचे कर्तव्यच आहे. तसे म्हटले तर ह्या बाईसाठी आम्ही विशेष असे काही केले नव्हते. एखादी अडलेली गरीब बाई असती तरी आमच्या डॉक्टरांच्या आज्ञेप्रमाणे तिलाही अगदी त्याच इतमामाने आम्ही वागवली असती.

पण ती बाई आमच्याशी इतक्या कृतज्ञतेने आणि औदार्याने वागली होती की, तिच्याबद्दल आम्हाला आपुलकी वाटणे अपरिहार्य होते. तिचे हे ऑपरेशन यशस्वी होऊन ती लवकरच साफ बरी व्हावी अशी प्रत्येक जण मनातल्या मनात देवाची प्रार्थना करीत होता.

ती गुंगीतून सावध झाली तेव्हा मी तिच्याजवळ होते. तिने डोळे उघडले. हालचाल केली आणि शेजारच्या खुर्चीवर बसलेल्या माझ्याकडे पाहून स्मित केले. मी उठून तिच्या बेडकडे जाताच तिने माझा हात धरला आणि आपुलकीने आपल्या हृदयाशी घट्ट पकडून ठेवला. कृतज्ञतेच्या भावनेने तिचे हृदय भरून जणू दुथडी वाहत होते असेच मला वाटले.

आता बरे वाटते ना असे मी तिला विचारले आणि ऑपरेशन यशस्वी होऊन ती पूर्णपणे व्याधिमुक्त झाल्याची जाणीवही मी तिला करून दिली. तिने पुन्हा पुन्हा माझे, डॉक्टरांचे आणि आमचे सर्वांचेच आभार मानले. अगदी आपल्या चामडयाचे जोडे करून घातले तरी हे उपकार साता जन्मीही फिटणार नाहीत अशी कृतज्ञ भावना व्यक्त केली आणि त्याच समाधानात-गुंगीच्या अमलात म्हणा वाटले तर—ती पुन्हा झोपी गेली. आमचे सगळे पेशन्ट्स असेच सहज झोपी जातात.

संध्याकाळी पांच वाजता ती जागी झाली. मी तिच्या खोलीतच होते. पहिलाच प्रश्न तिने मला केला तो त्या आंगठीबद्दलचा. 'आंगठी कुठे आहे ?' असे तिने मला विचारल्यावर मेट्रनच्या तिजोरीत ती ठेवली असल्याचे मी तिला सांगितले. "तावडतोब घेऊन ये ती !" ती म्हणाली.

मला थोडा राग आला होता. पण मी फार स्वाभिमानी आहे. मी तावडतोब मेट्रनकडून आंगठी घेऊन आले. तिच्या हातात आंगठी देताच तिने ती आपल्या नेहमीच्या बोटात ती चढवली.

थोडया वेळाने तिने आपल्या लाल स्वेटरची चौकशी केली. मी तोहि आणून दिला. थोडक्यात सांगावयाचे म्हटल म्हणजे तिच्या सर्व उदार भेटी तशाच एका पाठून एक तिच्याकडे परत आल्या. निर्विकारपणे तिने त्या प्रत्येकाकडून मागून घेतल्यावर त्या न येत्या तरच आश्चर्य ठरले असते.

तिने जेव्हा हॉस्पिटलमधून प्रयाण केले तेव्हा जाताना मला एक कसलेसे मासिक भेट म्हणून दिले. त्यावर संत्र्याच्या रसाचे, लोणी पावाचे डाग स्पष्टपणे दिसत होते. . .

अशी असतात एक एक माणसे. त्या त्या वेळी आम्हाला चीड येते त्यांची. पण नंतर आम्ही सर्व विसरून जातो—नेहमीच हे अनुभव मिळतात आम्हाला. गम्मत म्हणून तुम्हाला सांगितली ही एक हकिगत. अशा कितीतरी सांगता येतील. पण जाऊ द्या.

"आता तुमचा हात दुखत नाही ना साहेब !" ●●●

[**सुप्रसिद्ध आंग्ल कथाकादंबरीकार जेराल्ड कर्श ह्यांच्या** Gratitude **ह्या कथेचा अनुवाद.**]










**मिनेसोटा युनिव्हर्सिटीत प्रवेश म्हणजे मोठी कसोटी ! मोठमोठ्या 'तज्ञ' डॉक्टरांकडून 'कसून' तपासणी होते. ते 'दिव्य' पार पडले तर प्रवेश ! त्या दिव्यातून मी 'सुखरूप' पार पडलो व अगदी 'फिट्ट' ठरलो.**

# माझी तपासणी होते

—प्रभाकर अत्रे

**मिनेसोटा** युनिव्हर्सिटीत फक्त बुद्धिमत्तेलाच प्राधान्य दिले जात नाही, तर तुमच्या शरीर प्रकृतीच्या विकासाकडेही फार काळजीपूर्वक लक्ष दिले जाते. युनिव्हर्सिटीत प्रवेश मिळविण्यापूर्वी विद्यार्थी आरोग्य केंद्राकडून तुमची सखोल व कडक अशी तपासणी केली जाते. मिनेसोटा येथील आरोग्य केंद्र हे देशातील सर्वोत्कृष्ट केंद्र मानले जाते. मोठमोठे डॉक्टर तेथे निःस्वार्थ बुद्धीने व सेवेच्या उदात्त भावनेने येतात. आणि मिनेसोटाचे विद्यार्थी हे बलवान असे देशाचे आधारस्तंभ व्हावेत या भावनेने काम करतात. आपला वेळ व ज्ञान ह्याचा त्यांना लाभ व्हावा हीच सदिच्छा—दुसरे काय ?

मी त्या युनिव्हर्सिटीत गेलो त्या दिवशी त्या त्या क्षेत्रातल्या तज्ञ डॉक्टरांनी माझी जी कसून व बारकाईने तपासणी केली तिची आठवण आली की, मन कसं अगदी कृतज्ञतेने भरून येतं आणि मान नत होते. एका नव्हे तर अनेकांनी माझी कसून तपासणी केली.

मी प्रवेश केला. 'हाडांच्या डॉक्टरांकडे जा' मला सांगण्यात आले. मी गेलो. डॉक्टरांच्या टेबलापाशी उभा राहिलो. ते फिल्मी-विनोदाचे पुस्तक वाचण्यात गर्क झाले होते. "तुम्हाला हात किती आणि पाय किती ?" मान वर न करताच त्यांनी विचारले.

"दोन" मी उत्तर दिले.

"एकूण दोनच ?"

"नाही डॉक्टर साहेब. दोन हात आणि दोन पाय आहेत."

"मग ठीक तर ! तुम्ही जा. तुम्ही ठीक आहात" आपल्या हातातला अंक यत्किंचितही बाजूला न सारता ते म्हणाले.

नंतर मी हृद्रोग तज्ञांकडे गेलो. हृदय नाजुक असते. गुंतागुंतीचे असते. आणि त्याची तपासणी मोठी काळजीपूर्वक व्हावी लागते म्हणून त्या विभागासाठी दोन डॉक्टरांची नेमणूक केलेली आहे. मी त्यांच्या चेंबरमध्ये जाऊन पोहचलो तेव्हा ते दोघेही खिडकीशी उभे राहून पादचाऱ्यांच्या डोक्यावर पाण्याने भरलेल्या कागदी पिशव्या फेंकण्यात गर्क झाले होते.

"काल माझ्याकडे मोठी गंमतीची केस आली होती" त्यातला एकजण दुसऱ्याला सांगत होता. "काल मी एका मुलाचे काळीज तपासीत होतो. आणि मला आश्चर्याचा धक्काच बसला. त्याच्या काळजाचे ठोके पडत नव्हते. तर त्याच्या काळजातून संगीताची सुरावट ऐकू येत होती."

"कशामुळे असे होत असेल ?" दुसरा विचारीत होत..

साले मी अगदी गोंधळातच पडलो बराच वेळ. मग मी त्या मुलाचा पूर्वेतिहास विचारला. तेव्हा मला पत्ता लागला. त्याच्या आईला रेडियो कार्यक्रमांची एक प्रकारची धास्ती बसलेली होती."

"तुला ठाऊक नाही. मी त्याहून गंमतीची एक केस काल ऐकली. काल प्लॅस्टिक सर्जरी विभागाचे डॉ. कुरेट सांगत होते की, त्यांच्याकडे एक माणूस आला त्याला म्हणे नाकच नव्हते."





अनुक्रमणिका



## विचित्रटिका

**तलवारी पेक्षां**
**लेखणी श्रेष्ठ**
**तराजूपेक्षां**
**हातोड्याला कष्ट**
**नाटकांपेक्षां**
**कादंबरी मोठी**
**कथे पेक्षां**
**कविता छोटी**
**हसविण्यापेक्षां**
**रडविणें सोपे**
**चिडविण्यापेक्षां**
**वेडावणें सोपे**
**थोर आणि ग्रेट**
**सारेच सगळे**
**ज्याच्या वंशा जावे**
**त्यालाच मग कळे**

—ह. शि. खरात

"नाकच नाही ? बापरे !! मग वास कसा घेत होता ?"

"भयानक !"

"तुमच्याकडे साल्या माकडांच्या विनोदी कोलांटयापेक्षा जास्त विनोद भरलेला आहे हं."

तेवढ्यात मी खांकरलो. त्यांचे दोघांचे प्रथमच माझ्याकडे लक्ष गेले.

"मी हृदय परीक्षेसाठी आलो आहे." मी म्हणालो.

"तुम्ही ठीक ठाक दिसता. पुढे जायला हरकत नाही" ते दोघे म्हणाले. मी वळलो आणि कागदी पाण-पिशव्या भरण्यासाठी ते टबकडे वळले. नंतर मी वजन काट्यावर गेलो. उभा राहिलो. माझं वजन नोंदवलं गेलं. डॉक्टर म्हणाले "तुम्ही मित्र फार पटकन् जोडता. तुम्ही कामाला चांगले आहात. पण कामे हात राखून करण्याकडे तुमचा कल आहे. तुम्ही एक खूप मोठी सागरी सफर करणार आहात."

त्या वजन काट्याला मी नाणे दिले आणि पोटाच्या डॉक्टरकडे वळलं. तिथला डॉक्टर पाण्यात बोटी सोडण्याचा खेळ करण्यात दंग झाला होता.

"मध्यरात्री कधी उठावे लागते काय ?" त्याने मला विचारले.

"कधी कधी" मी.

"अच्छा ! अच्छा !!" माझ्या बोटीच्या शीडाचे काही नीटसे जमत नाही. काहीतरी घोटाळा होतोय बघा. तुम्हाला बोटीची काही माहिती ?"

"थोडीशी !" मी नम्रपणे सांगितले.

"मला नौका फार आवडतात. मला समुद्र आवडतो. अगदी ह्या क्षणी सुद्धा मला समुद्रावर एखादी मोठी नौका घेऊन पर्यटनाला जावसं वाटतंय्. उधाणलेल्या समुद्रावर एखादं प्रचंड गलबत आपण हाकारावं ही कल्पना मला फार मोहवते. प्रचंड लाटांशी झुंजत झुंजत माझं गलबत मी हाकारतो आहे. माझे शूर खलाशी डेकवर उभे राहून शिडे उभारताहेत, गाणी गाताहेत. जयघोष करताहेत. आणि मला वंदना करून म्हणताहेत कॅप्टन ! आपला प्रवास सुखकर झाला आहे. आनंद ! आनंद !!"

खरंच तुम्हाला नौकानयनासंबंधीची खूपच माहिती दिसतेय्." मी आदराने म्हणालो.

त्याने मान खाली घालून उगीच लाजल्यासारखे केले व तो म्हणाला, "असा-यलाच हवी ! १९१२ साली मी नौदलात होतो ना ! बरं पण ते जाऊ द्या. तेव्हा एकूण तुम्हाला मध्यरात्री उठावं लागतं तर !"

"होय डॉक्टर ! त्याचं काय आहे. माझी मॉर्निंगस्टार नांवाची एक बहीण आहे. तिचा एक मित्र आहे. तो नॅचे, डुलुच आणि मोबाइल रेलरोडवर इंजिनियर म्हणून काम करतो. एक वर्षापूर्वीपासून त्याची रात्रपाळी सुरू झाली आहे. आणि त्यामुळे माझी बहीण रात्रीची काही त्याला भेटायला जाईनाशी झाली. तिने इतकी तक्रार केली की, शेवटी त्याने एका रेलफाटा आमच्या घराच्या मागच्या बाजूला आणून जोडून दिला. आता रात्रपाळी आली की, तो गाडी आणून आमच्या घराशी थांबवतो मग मला उठून त्या एंजिनातले इंधन बघावे लागते. तो इंजिनियर येऊन माझ्या बहिणीला भेटतो."

पण ह्यातले तो काहीही ऐकून घेत नव्हता. तो आपल्या टेबलावरच्या बोटी-तच रमला होता." पण बोटीचा डेक नेमका कुठे येणार ?" तो मधूनच बडबडत होता.

मी हळूच तिथून बाहेर पडलो. आणि सांध्याच्या डॉक्टरकडे गेलो. तो डॉक्टर टेबलापलिकडे बसून तोंडात वाजा धरून त्यावर एक गाणे वाजवीत बसला होता.

"तुम्ही इकडे कसे आलात ?" त्याने मला विचारले.

"कां बरं ? मी चालत आलो" मी म्हणालो.

"छान ! छान !! म्हणजे तुमचे पाय धड दिसतात. अहो तुम्ही भाग्यवान आहात. अहो, काल परवा येथे एक मुलगी आली होती. तिचे पाय इतक्या विचित्र आकाराचे होते की, पुसता सोय नाही. अशा उंच पावलांनी ती अशी वाकून उभी राह्यची की, जणु ती पंचेचाळीस अंशाचा कोनच करून उभी आहे. तिचे उभे राहणे पाहिले की असे वाटायचे की, जणु ती बर्फावरून स्केटिंग करते आहे.

"मग तुम्ही तिच्यासाठी काय केले ?" मी.

"दुसरं काय करणार ? साहजिकपणे तिचे पाय कापणे हेच माझे कर्तव्य होतें. मी पाय कापले. आता तिला फार बरे वाटते. ती सुखी झाली आहे. आता तिला खूप मित्र झाले आहेत. ते तिला फार प्रेमाने व आपुलकीने म्हणतात "बुट्टी ! बुट बैंगण !"

मी तेथून निसटण्याचा पवित्रा घेतला.

"थांबा जरा. मी ह्या विषयात कसा शिरलो आहे ठाऊक ?" नाही ना ?"

"नाही !" खरोखरच मला कसे ठाऊक असणार ?

"अहो, माझी स्वतःचीच पावले एखाद्या बदकासारखी होती म्हणून" असं म्हणून तो उठला आणि त्या खोलीत तो धूम पळत राहिला. पाण्याचे फवारे त्याच्या मागून ठिबकत जात होते.



अनुक्रमणिका

तेथून मी निसटलो. शेवटी एका मानसोपचार तज्ञाकडे मला जावयाचे होते. त्याची तपासणी झाली की, ते तपासणीचे दिव्य संपणार होते. तो खिडकीतून गोल्फचे चेंडू उडविण्याच्या खेळात गढून गेला होता. बाहेर ते चेंडू मिळविण्यासाठी 'हीऽऽ' गर्दी झाली होती. चेंडू उडवता उडवता, माझ्याकडे न पाहताच त्याने विचारले "घराण्यात काही वेड वीड नाही ना ? चक्रमपणाच्या छटा ?"

'वेडच आहे असं म्हणता येणार नाही पण त्यातले काहीजण जरा अधुनमधुन विचित्रपणे वा विनोदी पद्धतीने वागतात खरे. पण मी मात्र त्याला वेड म्हणणार नाही. उदाहरणार्थ, माझा काकाच घ्या ना. तो सध्या वॉशिंग्टनमध्ये असून सॅक्को आणि वात्झेट्टी ह्यांच्या सुटकेच्या अर्जावर सह्या घेतच भटकतो आहे. आणि माझा चुलतभाऊ रॉजर त्याच्याकडे एक लहानसे शेत आहे. डेस मोनेस जवळच ते आहे. दररोज त्या शेतात जे पिकते ते एका चौकोनी चाकांच्या गाडीत घालून तो डेस मोनेसला घेऊन जातो. आतां पेरले आज की, उगवले उद्यां असे त्याला वाटत असले पाहिजे. डोनाल्ड नांवाचा माझा चुलता आहे. त्याने तर रेनॉल्डस् तंबाखू कंपनीवर फिर्याद केली आहे. लक्ष डॉलर त्याला हवेत म्हणे. त्याचे म्हणणे असे की, त्यांची तंबाखू ओढून ओढून त्याच्या पाठीवर मोठे वेंड आले आहे व पाठ वांकली आहे. माझी आत्या आहे येट्टा नांवाची ! तिला दर वेळी पैसे पाहिजे असतात. आता दांत कोरून पोट भरता येते अशी समजूत करून घेऊन ती काय करते आहे ठाऊक ?– एक दांत उपटते आणि उशीखाली ठेवून देते. आणि राहता राहिली बूकर– माझा चुलतभाऊ ! त्याला आपल्या खिशांत हिरे माणकं असल्यासारखे वाटते. मलेनी आत्या सारखी चर्चेसना शिव्या देत असते आणि अलेक्स नांवाचा काका आहे तो भितीला टांगून घेतो आणि म्हणतो मी टेलिफोन आहे आणि मिल्टन नांवाचा एक चुलता तर १९२४ पासून एका पोस्ट होलमध्ये खडा आहे. पण मी त्याला वेडवीड म्हणणार नाही. तुमचे काय मत आहे डॉक्टर ?"

"निश्चितच नाही ! ते फार तर दमले भागले असतील असे म्हणता येईल. अच्छा, दोस्ता आता तुझी तपासणी संपली आहे. मी तुझे अभिनंदन करतो. तुला ह्या मिनेसोटा युनिव्हर्सिटीत विद्यार्थी म्हणून दाखल करून घेण्यात आले आहे.

माझ्या डोळ्यात घळघळा अश्रू वाहू लागले व माझा कंठ दाटून आला.

"बोलू नकोस अगदी. फक्त मला जरा घट्ट पकडून ठेव. तुला अशाच रूपात सतत स्मृति-कोषात जपून ठेवावे असे मला वाटते." डॉक्टर म्हणाले.

मी थोड्याच वेळात स्वतःला सांवरले. आणि माझी ही निवड सुयोग्य ठरावी ह्या दृष्टीने प्रयत्न करण्यात मी यशस्वी होईन ह्या आशेने मी चालू लागलो. त्या विविध चांचण्यात मी यशस्वी ठरलो होतो. माझी तपासणी–कसून व सर्वांगीण तपासणी झाली होती. ● ● ●

[मॅक्स शूलमन ह्या लेखकाच्या "व डे आय् वॉज एक्झॉमिन्ड" ह्या कथेचा काहीसा स्वैर अनुवाद.]

त्याचा चेहरा पांढरा झाला होता.
हात थरथरू लागले. तो मोठ्याने ओरडला,
"हो हे नाकच आहे ! पावामध्ये
नाक कसे काय आले ?

# ना क !


—सौ. लीला देशमुख
बी. ए. (ऑनर्स) बी.टी.


**आयव्हान** न्हावी रोजच्यापेक्षा सकाळी लौकर जागा झाला तेव्हा भट्टीमधून बाहेर काढलेल्या ताज्या गरमागरम पावाचा वास घरभर सुटला होता. त्या खरपूस सुवासाने त्याला एकदम सपाटून भूक लागली म्हणून तो अंथरुणातून ताडकन उठून स्वयंपाक घरात गेला आणि बायकोला मोठ्या लाडात म्हणाला, "प्रास्कोव्ह्या ओसिपोव्हना, आज मी ताज्या पावाबरोबर कांदा खाईन ! मी कॉफी पिणार नाही—माझी कॉफी आज तू पिऊन टाक !" त्याची बायको मोठी सुग्रण होती पण ती स्वभावाने कजाग—अगदी भांडकुदळ होती. त्याची सकाळच्या न्याहारीला कांदा खाण्याची लहर तिने चालू दिली नसती. परंतु तिला कॉफी फार आवडे. त्याच्या वाटणीची कॉफी फस्त करता येईल हे बरीक ठीक तिला पसंत पडले. ताजा पाव तसाच तिने टेबलावर भिरकावून दिला आणि कॉफीचे भांडे चुलीवर चढविले.

न्हावी आनंदून गेला. घाईघाईने त्याने टोपलीमधून दोन कांदे घेतले. मीठाचे पाळे सुरी आणि दोन बशा टेबलावर मांडल्या. शर्टाच्या बाह्या घडी करीत वर घेतल्या. बायकोवर इम्प्रेशन पडावे म्हणून स्वयंपाक करताना वापरतात ते खास फडके गुंडाळून त्याची नाडी पद्धतशीरपणाने मागच्या बाजूस नीट बांधली. सुरी कपड्याने नीट पुसल्यानंतर पावाचे तुकडे करताना त्याने पुष्कळसे गांभीर्य आणि खूपशी ऐट आणली.

पावाचे दोनतीन तुकडे सफाईने कापले गेले आणि त्यानंतर त्याची सुरी अडकली. पावामध्ये आत काहीतरी पदार्थ आला होता. त्याने बोटाने तो पदार्थ खरवडून बाहेर काढला. आणि हातात जो ऐवज आला तो पाहिल्यानंतर त्याची सगळी ऐट खलास झाली. पुन्हा पुन्हा डोळे चोळीत तो ती जिन्नस डोळे वटारीत चापसून पहातच राहिला. त्याचा चेहरा पांढरा झाला. हात थरथरू लागले तो मोठ्याने ओरडला, "हो नाकच आहे ! पावामध्ये नाक कसे काय आले ?"

बायको एकदम भडकली. कमरेवर हात ठेवून तिने त्या नाकाजवळ तोंड नेऊन ते नीट बघितले.

"मेल्या ! जनावरा ! बदमाष दारुड्या मेला ! मी आत्ताच्या आता जाते आणि पोलिसाला घेऊन येते. कुणाचं नाक कापलंस हे ? तरी मला लोक नेहमी सांगतात की, दाढी करतांना तू गिऱ्हाईकांची नाकं एव्हढी चिमटीत घट्ट धरून उपटतोस की, ते खुर्चीत अर्धमेले होऊन पडतात !" खरं म्हणचे न्हावी आता अर्धमेला होता. खिडकीजवळ त्याने ते नाक नीट तपासून पाहिले. ते त्याच्या अगदी ओळखीचे वाटत होते. काही क्षणातच त्याच्या लक्षात आले की, हे नाक मेजर कोव्हॅलेव्हचेच आहे ! मेजरची दाढी करण्याकरिता तो दर बुधवारी आणि रविवारी जात होता ना!

"मला एक जुन्या कापडाची चिंधी दे." बायकोजवळ येऊन तो हळु आवाजात म्हणाला, "मी हे सध्या गुंडाळून घरात





अनुक्रमणिका

कुठेतरी लपवून ठेवून देतो. पुन्हा केव्हातरी त्याची पुढची विल्हेवाट लावीन". बायको एकदम उसळली. "ते काहीएक मला चालणार नाही! कापून आणलेलं नाक मी माझ्या घरात एक क्षणभरहि तुला ठेवू देणार नाही! आता जा आणि तुला काय करायचे आहे ते करून टाक! चल नीघ!"

न्हावी थिजून उभा राहिला होता. बायकोने गचांडी दिली तसा तो भानावर आला. घाईघाईने त्याने एक चिंधी शोधून काढली आणि नाक त्यात गुंडाळून ती पुरचुंडी कोटाच्या खिशात काळजीपूर्वक ठेऊन तो झपाट्याने घराबाहेर पडला.

★ ★

**रस्त्यावर** इतक्या सकाळी नेहमीची वर्दळ अजून सुरू झालेली नव्हती. न्हाव्याला खूप बरे वाटले. आता रस्त्याच्या बाजूस कुठच्याहि मोठ्या दगडाखाली तो नाक ठेऊन देणार होता. त्याने खिशात हात घातला इतक्यात "काय न्हावीदादा! आज लौकर बाहेर पडलात?" अशी एका गिऱ्हाईकाची ललकारी ऐकताच तो दचकला. आता चार दोन गल्ल्या ओलांडल्याशिवाय गत्यंतर नव्हते. निर्जन अशी गल्ली सुरू झाली तेव्हा त्याने खिशातील गांठोडे अलगद कोपऱ्यात फेकून दिले आणि तो तरातरा चालतच राहिला. "अहो मिस्टर! तुमच्या खिशातून काय पडले ते तरी पहा!" अशी एका खिडकीतून आरोळी आली तेव्हा तो मागे फिरला. आपली महत्वाची जिन्नस पडली होती. बरे झाले नुकसानी टळली अशा तऱ्हेचा अभिनय करीत त्याने ती पुरचुंडी खिशात परत ठेवली व त्या खिडकीमधील व्यक्तीचे आभार मानले. छेः गांवातील कोणत्याहि रस्त्यावर हे काम जमणार नाही. असा विचार करीत तो थेट नदीवर बांधलेल्या मोठ्या पुलाच्या मध्यावर येऊन उभा राहिला. मागे पुढे एक दृष्टिक्षेप टाकून त्याने खिशातला ऐवज खाली पाण्यात भिरकावला. छातीवरचे मोठे दडपण कमी झाले असे त्याला वाटले. सुटकेचा निश्वास सोडीत तो घराकडे वळणार तोच एक भला जाडजूड पोलीस जमादार खांबाआडून पुढे झाला आणि त्या जमादाराने त्याला थांब अशी खूण केली. न्हावी भलताच घाबरला. डोक्यावरची टोपी काढून त्याने जमादाराला नम्र अभिवादन केले.

"इतक्या सकाळी तू नदीवर काय करीत होतास?"

"जमादार साहेब, मी न्हावी–माझे नदीवर काय काम? मी आपला सहज मजेने नदीला पाणी किती आले हे पाहिले. आधीच मला उशीर झाला आहे–गिऱ्हाईके माझी वाट पहात असतील!"

पोलिस जमादाराने आपल्या प्रचंड हाताने त्याची कोटाची कॉलर गच्च पकडली आणि त्याला फरफटत चौकीकडे नेले.

★ ★

**मेजर** कोव्हॅलेव्ह आज झोपेतून जेव्हा जागा झाला तेव्हा त्याला आपल्या नाकावर काल एक पुटकुळी आली होती त्याची आठवण झाली. आरशाजवळ जाऊन तो आपले नाक पाहू लागला तेव्हा आपल्या प्रतिबिंबांत त्याला नाक मुळातच दिसेना. हाताने चापसले तेव्हा नाकाऐवजी सपाट गुळगुळीत जागाच त्याच्या बोटास लागली. "हा रात्रीच्या पिण्याचा परिणाम! काल जरा जास्तीच झालं हं!" असे पुटपुटत त्याने गार पाण्याचे फवारे चेहऱ्यावर उडविले. टॉवेलने चेहरा साफ करीत त्याने पुनः एकदा आपले आरशातले प्रतिबिंब नीट न्याहाळून पाहिले.

छेः छेः नाक नाही!

हा भलताच घोटाळा झाला होता! नाक नसल्यामुळे आपली रोजची कामे दबदब्याने पार पाडणे कठीणच होते! हाताखालच्या पोलिसांवर–जमादारांवर ओरडणे अशक्य होते! आणि मेजरच्या अनेक मैत्रिणी होत्या! त्याच्या भावी वधूचा वाढदिवस मोठ्या थाटाने साजरा होणार होता. त्या मेजवानीच्या प्रसंगी आपण कसे हजर रहाणार? चेहेऱ्यावरील नाक बेपत्ता झाल्यानंतर आपण आता प्रेमाच्या कानगोष्टी तरी कशा करायच्या हा मोठाच प्रश्न होता!

★ ★

**घोड्याची** शानदार गाडी वर्तमानपत्राच्या कचेरीजवळ येऊन थांबली. रुबाबदार पोषाख केलेला मेजर त्यामधून खाली उतरला. छातीवर लटकावलेले बिल्ले आणि रंगीत फिती आणि कंबरेला लटकलेली तरवार त्याला किती शोभून दिसत होती. पण उजव्या हाताने त्याने आपले तोंड हातरुमालाने धरून ठेवले होते. पहाणाराला असे वाटावे की मेजरसाहेबांच्या नाकातून रक्त येते आहे.

"जाहिराती कोण स्वीकारतं इथं?"

"आपला कुत्रा हरवला आहे वाटतं?"

"छे. छे. मला चांगले बक्षीस जाहीर करायचे आहे!"

"हां. हां. जरुर! बक्षिसाची रक्कम मोठी असली तर अर्थातच शोध लवकर लागेल! काय हरवले आहे?"

"फार महत्त्वाची गोष्ट हरवली आहे! माझे नाक पळून गेले आहे?"

"मग जाहिरात कशासाठी देत आहात?"

"त्या नाकालाच नोटीस द्यायची आहे! ताबडतोब परत ये म्हणून!"

"आँ! माझा विश्वास नाही बसत. नाक कधी पळून जाईल का? आणि ते काय पेपर वाचून परत येईल म्हणता?"

मेजरने मोठ्या झटक्यात तोंडावरील रुमाल बाजूला करून त्याला नाक असलेली रिकामी जागा दाखविली.

"हे बघा संपादक साहेब–वाटेल तेव्हढे बिल करा–परंतु माझ्या नाकाला नोटीस मिळालीच पाहिजे! अहो काय सांगू तुम्हाला–काल रात्रीपर्यंत ते माझ्याजवळ राहीले–आणि सकाळी पहातो तो 'गायब!' असे एकाएकी त्याने कां बरे पळून जावे?"

नाकाची जागा नीट न्याहाळून पहात संपादक, म्हणाले, "होय तुमचे नाक जागेवर नाही हे खरे आहे–परंतु –आम्ही अशा तऱ्हेची जाहिरात छापू शकत नाही."






अनुक्रमणिका

"कां ?"

"आमच्या पेपरच्या प्रतिष्ठेचा प्रश्न आहे हा !"

"म्हणजे ?"

"म्हणजे आमच्या वाचकांना वाटणार की ही शुद्ध बनवा-बनवी आहे !"

"मी तुमची खात्री करून दिली आहेना ?"

"हो—माझी खात्री झाली–परंतु प्रत्येक वाचकाची खात्री कशी काय होणार ? तुम्ही कशी करणार ? आणि मी तरी कशी करून देणार ?"

मेजर अगदी संतापाने बेभान झाला. संपादक मात्र थंड होता. त्याने तपकिरीची डबी उघडली आणि शांतपणाने नाकात कोंबली. हातरूमालाने आपले नाक स्वच्छ करण्यास त्याने सुरुवात केली तेव्हा मेजर फारच अस्वस्थ झाला. संपादकाने नाकपुड्या साफ करून तपकिरीची डबी मेजर पुढे धरली.

"मेजरसाहेब जरा तपकीर ओढून पहा ! डोके ताळ्यावर येण्यासाठी तपकीर फार चांगली !"

"संपादक महाराज अशी क्रूर थट्टा तुम्हाला कशी करवते ? माझे नाक हरवले आहे आणि तुम्ही तपकिरीची डबी माझ्या समोर धरता ? अहो तपकीर मी ओढणार कसा ?"

धाड धाड पावले टाकीत मेजर साहेब तिथून चालते झाले.

★ ★

**कोतवालीत** जाऊन आपले नाक हरवल्याची गोष्ट फौजदाराच्या कानावर घालण्यास मेजरना दुपार झाली होती. फौजदार नुकतेच जेवण करून परतले होते. मेजरसाहेबांचे नाक हरवले ह्याचे आपणास फार दुःख होत आहे. असे म्हणत फौजदार पुढे म्हणाले, "हे बघा मेजर साहेब, मी आता नुकताच जेऊन आलो आहे–परमेश्वराने दुपार ही जेवण झाल्यानंतरची विश्रांतीची वेळ म्हणून मुकर केली आहे. माझ्याकडे खून, लाखो रुपयांचे दरवडे अशा किती तरी महत्त्वाच्या केसेस आल्या तरी सुद्धा दुपारी मी काहीही करीत नाही. मी आता थोडा वेळ झोपणार आहे. नाक हरवणे ही एक फार किरकोळ गोष्ट आहे. तुम्ही उद्यां सकाळी या. आपण शोध करू !"

फौजदारसाहेबांच्या या मुक्ताफळानंतर पुढे काय बोलावे हे न सुचल्यामुळे मेजर साहेब खिन्न मनाने तेथून उठले.

★ ★

**मेजर** साहेबांच्या दिवाणखान्यात नोकराने येऊन सांगितले की त्यांना भेटावयास एक पोलीस जमादार आला आहे. कोतवालीमधून परत आल्यापासून मेजरसाहेब घरातच बसून होते. त्यांना खाणे पिणे सुचेना. एकसारखी त्यांना आपल्या नाकाची काळजी लागली होती.

त्यांच्या दिवाणखान्यात कुणी नोकर चाकर आला की, त्यांना तोंडावर हातरूमाल धरून ठेवावा लागे. ही एक आणखी कटकट झाली होती. पोलीस जमादार दिवाणखान्यात येऊन पोहोचला आणि नोकर बाहेर गेला.

जमादाराने हळू आवाजात विचारले, "मेजर साहेब आपली काही वस्तु हरवली आहे का ?"

मेजरसाहेबाने उत्तर देण्याऐवजी त्याच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेने बघण्यास सुरुवात केली तेव्हा जमादार म्हणाला, "आपले नाक हरवले आहे ना ?"

झटकन् तोंडावरला हातरूमाल काढीत मेजर म्हणाले, "होय–होय–मी माझी तक्रार नोंदवून आलो आहे–"

जमादार म्हणाला, "आपले नाक सांपडले आहे."

"केव्हा ? कुठे ? चला ते माझ्या ताबडतोब स्वाधीन करा. मी कपडे करतो."

"मेजरसाहेब—आपण इथंच स्वस्थपणाने थांबा. आपले नाक मी बरोबर आणले आहे. ओळख पटली तर ते तुमच्या स्वाधीन करण्याचा हुकूम आहे मला."

जमादाराने एक थैली काढली आणि त्यामधून मोठ्या काळजीपूर्वक नाक बाहेर काढले आणि ते तळहातावर धरीत मेजरना विचारले, "हे आपलेच नाक कां ?"

मेजरने उडी मारून ते नाक हस्तगत केले आणि नीट पारखून पाहिल्यानंतर ते ओरडले, "सांपडले ! हरामखोर बेटे पळून गेले होते ! जमादार हे माझेच नाक आहे ! या आनंदाच्या प्रसंगी आपण दोघे आता थोडी दारू पिऊ या !"

"मेजरसाहेब ! या आनंदाच्या प्रसंगी मी हजर आहे हे माझे सुदैव ! आपले नाक आपल्याला परत मिळाले ही खरोखर मोठी चांगली गोष्ट झाली. सरकार ! महागाई किती वाढत चालली आहे ! शिवाय घरांत पोरे तरी किती ? संसार चालविताना अगदी मेटाकुटीस आलो आहे महाराज !"

मेजरने कपाट उघडून घाईघाईने काही नोटा काढल्या आणि त्या जमादाराच्या हातात कोंबल्या तेव्हा तो सलाम ठोकून निघून गेला.

आपले नाक हातात धरून मेजरसाहेब साऱ्या दिवाणखान्यात आनंदाने नाचत सुटले.

जराशाने ते आरशासमोर उभे राहिले. आपले नाक हाताने योग्य जागेवर धरून ते आपले प्रतिबिंब पाहून एकदम खूष होऊन गेले. परंतु हात काढून घेतला तेव्हा नाक खाली पडले.

अरेच्या ! ही एक पंचाईतच आहे बुवा ! हे नाक आता परत बसवायचे कसे ?

नाक उचलून परत जागेवर चिकटवून धरीत ते ओरडले, "मूर्खा ! आता तरी बसना आपल्या जागेवर !"

★ ★

**निरोपासरशी** मेजर साहेबांचे डॉक्टर ताबडतोब येऊन पोहोचले. मेजरचे नाक हातात धरून ते म्हणाले, "छे. छे. आता तुमचे नाक पहिल्या जागेवर बसवणे अगदी अशक्य आहे ! ऑपरेशन करून जरी मी ते बसविले तरी त्याला रक्ताचा पुरवठा

[पृष्ठ ६१ वर पहा]



[ छायाचित्र : के. टी. देशमुख ]




# बहुरुपी पु. ल. दे.

**पु.** ल. देशपांडे यांच्या नांवामागे 'पद्मश्री' लावताना प्रशस्त काही वाटत नाही. वास्तविक त्यांना 'पद्मश्री' दिल्याचं जेव्हा वर्तमानपत्रात वाचलं तेव्हा बरं वाटलं. फार बरं वाटलं. माथं अभिमानानं वर झालं. पु. लं. सारख्या माणसाना अशा पदव्या मिळतात तेव्हाच त्या सार्थ होतात आणि त्यांचा प्रभाव फाकतो असंहि जाणवलं. असं असूनहि पु. लं. च्या आगेमागे काही जोडण्याची आवश्यकता नाही इतकं त्यांचं नांव आणि लौकिक स्वयंपूर्ण आहे. कारण ते स्वार्जित आहे. कोणत्याहि उपऱ्या गुणामुळे किंवा प्राप्त अधिकारपदाच्या अनुषंगाने पु. लं. चं यश आणि लोकप्रियताहि सिद्ध झालेली नाहीत. साहित्य आणि नाट्य या क्षेत्रांत विनम्र होऊन वावरणाऱ्या या माणसाने 'क्षेत्रे' काबीज करण्याचा ना चंग बांधला, ना हव्यास धरला. या दोन्ही क्षेत्रात आज पु. लं. चे स्थान अनभिषिक्त सम्राटासारखे आहे असे म्हटल्यास ते मुळीच अतिशयोक्तीचे ठरू नये. मानमरातबाकरता आणि सभा संमेलनांच्या अध्यक्षस्थानाकरता 'घाई' लागल्या सारखी माणसं जेव्हां हपापतात तेव्हा पु. ल. त्याबाबतीत अगदी 'स्थिरचित्त' असतात असे नव्हे तर कुणी सन्मानला गेला तर त्याला दिलखुलासपणे मुजरा करावयास पुढे असतात. या केवळ व्यवहार नाही तर निव्वळ कलावंताचे औदार्य आहे. यामुळे झाले काय कीं पदे पु. लं. च्या पुढे खुजी ठरू लागली. पु. ल. नी ती भूषवली तर त्यांची उंची वाढू लागली. प्रतिष्ठा वाढू लागली. मला तर असे वाटते कीं पांच वर्षापूर्वी पु. ल. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाले असते तर अध्यक्षपदामुळे पु. लं. च्या व्यक्तिमत्वाला धन्यता लाभली असती. आज चित्र बदलले आहे. केव्हा ना केव्हा पु. ल. ना अध्यक्ष निवडून साहित्य संमेलनाला स्वतःचा मान राखून घेण्याखेरिज आज गत्यंतर उरले नाही.

—असे काय झाले गेल्या पांच वर्षात? पु. ल. नी काय असा चमत्कार केला कीं पांच वर्षात असा लक्षणीय फरक पडला? याचे एकतर्फी उत्तर देऊन चालणार नाही. महाराष्ट्राला वेड लावणारे पु. लं. चे 'तुझे आहे तुजपाशी' पांच वर्षापूर्वीचे आहे. जाहीरातीत त्यांचे नाव पाहताच कोणत्याहि मासिकाच्या दिवाळी अंकावर वाचकांच्या ज्या त्यांच्या रसील्या, दर्दभऱ्या आणि जिवंत व्यक्तिचित्रांच्यामुळे उड्या पडेत ती व्यक्तिचित्रे त्यानी या पांच वर्षापूर्वीच्या काळातच मुख्यत्वे घडवली. अनामिकाची 'बटाटयाची चाळ'हि पांच वर्षापूर्वीची होय. असे असूनहि पु. ल. या नांवाचे आकर्षण वाढत्या श्रेणीने जे शिगेस पोहोचले आणि महाराष्ट्रास वेड लावून राहिले आहे ते गेल्या पांच वर्षातच विशेषेकरून होय. कारण असे कीं, 'दूधभात' बोलपटापासून पु. लं. चं कला–कसब सर्वांगानी जे प्रकटू लागलं ते बटाटयाच्या चाळीपर्यंत एकावर एक कळस चढवल्यागत. सर्व साधारण मराठी माणसासमोर पु. लं. च्या कला–निर्मितीला आणि कला–दर्शनाला जे सातत्य आलं त्यात तोचतोपणाचा लवलेश नव्हता. अपेक्षाभंग नव्हता. मौलिकतेला उद्बोधकता होती. रंजकता होती. संयम होता. एकट्यानं कुणी पूर्वी असं साधलं नव्हतं. साधलं होतं तरी सर्वांना असं लुटता आलं नव्हतं. बस्स! रसिकता एकदम खूश झाली. 'पु. ल.—शरण' बनली. जे जे पु. ल. प्रणित असले ते अस्सलच असणार, टाकाऊ नसणार याची खात्री आली. याचीच पावती गेल्या पांच वर्षात मराठी माणसांनी भरघोसपणे दिली. याहि काळात पु. ल. नी आपलं सौजन्य आणि विनय सोडला नाही. तो अंगभूत आहे, अभिनय नाही हे आचार–विचारानं दाखवलं. या बाबतीतच त्याना अभिनय जमत नाही.

सतत अवधान बाळगणे आणि आपल्या इच्छित कार्याचे अविरत अनुसंधान ठेवणे ही पु. लं. च्या कला-जीवनाची अविभाज्य अंगे होत. पु. ल. नी ज्या माणसांच्या हाताखाली आणि बरोबर काम केले ती माणसे पुष्कळशी होती त्याच ठिकाणी आहेत. पण पु. ल. नी त्यांचे ऋण दिलदारपणाने नेहमी मान्य केले. त्यांचा अवमान पूर्वी किंवा नंतर केला नाही. आपले

स्वातंत्र्य बाधक न ठरता आणि अबाधित ठेवून हे करणे म्हणजे एक 'सिद्धि' होय. पु. ल. ना ही सिद्धि साधली. कारण साहित्य काय किंवा नाट्य काय, संस्कृतीचे जग होय. अन्यत्र जो हेवादावा, विद्रोह, द्वेष, संघर्ष, क्षुद्रता, स्वार्थ आणि असहिष्णु वृत्ति यांचे थैमान दिसते, ते निदान पक्षी संस्कृतीच्या जगात तरी नसावे हे अवधान लाख मोलाचे नाही काय? याच्याच जोडीला संस्कृतीची उपासना ही दैवी उपासना आहे. 'देवाचे देणे' लाभते आणि जीवन कृतार्थ होते. ही जाण आली कीं सर्जन अंकुरते. फुलारते. फळाला येते. पु. ल. नी आयुष्यात अनेक व्यवसाय करूनहि कोणत्याहि एका चाकोरीच्या व्यवसायात त्यांचे मन गुंतून राहिले नाही यांत त्यांच्या पिंडाच्या प्रकृतीची कुळी उमगते. 'सुंदर मी होणार' नाटकात आलेले अशाच अर्थाचे विचार त्यांच्या पात्राचे केवळ न ठरता पु. ल. ना उजळणारे विचार वाटतात.

विद्वान, दर्दी, नक्कले, नाटकी अशा सर्वांच्या सहवासात रंगणारा हा कलावंत आपली कला जोपासताना तसा अविचल राहिला. कारण अपयश म्हणजेच बावनकशी कला असें एकांगी समाधान मानणाऱ्या वर्गाची फारशी फिकीर न करता पु. ल. नी आपला मार्ग अनुसरला. दार बंद करून पंख्याखाली गंभीर चेहरा करून कलेचे विश्लेषण करणे किंवा कीस वाढणे कठिण नाही. पण सर्व कलांच्या आवाहनाचा ( appeal ) जो भाग तो कलाबाह्य ठरवण्याइतका गौण नक्कीच नसतो. खुद्द बालगंधर्वांच्या काळी किंवा आजहि कुमार गंधर्वांच्या गाण्याला शास्त्रीय किंवा अन्य घराण्यांच्या शिस्तीच्या कसोटीवर उणे ठरवण्याचा प्रयत्न झाला आणि होतो. हे प्रयत्न विसरले जातात; नाकदूऱ्या काढणाऱ्या व्यक्तीहि एक पुसटते पाऊलहि उमटवू शकत नाहीत. गंधर्व अमर असतो मनात, कानात आणि इतिहासात. पु. लं. चं आवाहन असंच आहे. रूढ किंवा पुस्तकी कलेच्या निकषावर पु. लं. च्या आवाहनाचे सामर्थ्य कधीच कळणार नाही. असं असलं तरी मनात सतत प्रश्न येतो कीं, 'वाऱ्यावरती वरात' 'असा मी असा मी' 'जिजामाता' आणि 'माझा हुंसवण्याचा धंदा' यात काही 'बटाटच्या चाळ' नंतर क्रम लावावासा वाटत नाही. कुठे तरी चुकेल असं वाटतं. रसिकतेला असा संभ्रम पूर्वी पडला नव्हता. या संभ्रमातून पु. लं. च आपली सुटका करतील अशी रसिकांची अपेक्षा आहे आणि या अपेक्षेतच पु. लं. च्या सृजन शीलतेची ग्वाही आहे. हा मनुष्य सतत वाढणारा आहे. मराठी माणूस डोळे लावून बसला आहे... 'वाहवा' म्हणावयास अन् दाद द्यावयास— अशा या बहुरुपी व्यक्तित्वाला व बहुरुपी सृजनाला आम्ही मानाचा मुजरा करतो. सुयश चिंतितो. ★ ★ ★

## कला-साधना 'राजमान्य' होते

**गणतंत्राच्या** वर्धापन दिनी मान सन्मानाची बिरुदे बहाल करण्याची (काहीशी) संस्थानी पद्धत आपल्याकडे चालू आहे. कला—(साहित्य—संगीतादि) विज्ञान, वैद्यकादि विविध क्षेत्रातल्या 'विक्रमी' साधकांना काही मान बहाल केले जातात. त्या साधनेला त्यामुळे एक प्रकारची राजमान्यता मिळते. नव्या साधकांना प्रेरणा स्थाने गवसतात. कला—साधना हा एक निष्काम कर्मयोग आहे हे कितीही खरे असले तरी त्या साधनेचा गौरव व्हावा हेही तितकेच खरे—मानवी आहे. त्या साधनेचा तो गौरव म्हणजे काही त्याचे लौकिक मूल्यांकन नव्हे. तशी ती साधना काहीशी 'अलौकिक' असल्याने तिचे 'लौकिक' मूल्यमापन हे कठिणच ! पण हे उपचारही आवश्यक—इष्ठ ठरतात—उपकारक ठरतात!

यंदा साहित्य अकादमी व केंद्रशासनाने कलेच्या क्षेत्रातल्या गुणी जनांना पुरस्कार दिले आहेत. त्यांत महाराष्ट्राशी ज्यांचे निकटचे नाते आहे असे काकासाहेब कालेलकर, इब्राहिम अल्‌काझी, इंदूरचे वि. सी. सरवटे, सुप्रसिद्ध चित्रकार मक़बूल फिदा हुसेन ह्यांचा समावेश होतो. काकासाहेब कालेलकर हे मराठी असूनही गुजराथी भाषेत त्यांनी विपुल ग्रंथ रचना केलेली आहे हे साऱ्यांना विदित आहेच. त्यांच्या **'जीवन व्यवस्था'** ह्या गुजराथीतील निबंध संग्रहाला साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाला आहे. काकासाहेब कालेलकर यांची राजकारण विषयक मते साऱ्यांनाच पटतील असे नाही. पण त्यांची ग्रंथ सेवा मात्र 'लोकमान्य' होती. विचारवंत, तत्वज्ञ, साहित्य, जीवनाचा गाढ व्यासंगी, तपस्वी साधक म्हणून काकासाहेब प्रसिद्ध. महाराष्ट्राने गुजराथला आपले दोन सुपुत्र दिले आहेत. **पंडित सातवळेकर** व **काका कालेलकर.** ह्या दोघांनी महाराष्ट्राची कूस धन्य केली आहे. इब्राहिम अल्‌काझी हे आज दिल्ली—स्थित असले तरी त्यांच्या नाट्य सेवेची 'प्रयोगांची' वर्षे मुंबईतच त्यांनी घालविली आहेत. लंडनच्या रॉयल अकादमीमध्ये नाट्यविषयक आधुनिक तंत्रांचा शास्त्रशुद्ध अभ्यास त्यांनी केला व परत आल्यावर त्यांनी मुंबईत **थिएटर युनिटची** स्थापना केली. त्या संस्थेने भारतीय भाषातल्या उत्तम नाट्यकृतीना 'जीवन' दिले तसेच रंगभूमि विषयक एक आधुनिक दृष्टीकोन देण्याचेही कार्य केले आहे. ते उत्तम दिग्दर्शक आहेत, तंत्रज्ञ आहेत. अभिनेते आहेत. नाट्यविषयक टीकाकार व वक्ते आहेत. आजच्या नवनाट्य—न नाट्य प्रकारांत अल्‌काझी हे एक 'पीठ' मानले जाते. त्यांच्या शब्दांना वेदांतील ऋचांचे महत्व आहे. आज ते दिल्ली येथील नॅशनल स्कूल ऑफ ड्रामाचे प्रमुख म्हणून काम करतात. पण 'थिएटर युनिट' मुळे ते महाराष्ट्राशी संबंधित आहेत. इंदूरचे वयोज्येष्ठ समाजसेवक साहित्यकार वि. सी. सरवटे ह्यांनी अमराठी प्रांती साहित्यसभा व तद्‌द्वारे अमोल साहित्य सेवा केली आहे. इंदुरच्या साहित्य चळवळीचे ते प्रमुख आधार आहेत. त्यांची वाङ्मयीन कारकीर्द भरगच्च नसली तरी मौलिक आहे. साहित्यविषयक संदर्भ ग्रंथात त्यांची रचना जाऊन बसलेली आहे ही एकच गोष्ट तिची मौलिकता व तिचे आगळेपण सिद्ध करते.

श्री. **वि. सी. सरवटे** हे आज वयाने वृद्ध झाले असले तरी साहित्य रसिक हा 'अजर' असतो. त्याला जरा मरण जिंकू शकत नाही ह्याचा प्रत्यय त्यांच्याकडे पाहून येतो.

महाराष्ट्राबाहेरचे पण साहित्याचे साधक म्हणून महाराष्ट्राला परिचित असे श्री. **राजेन्द्रसिंग बेदी** यांना त्यांच्या **"एक चादर-मैली सी"** ह्या उर्दू कादंबरीबद्दल अकादमीचे पारितोषिक मिळाले आहे. तर **डॉ. नगेन्द्र** ह्यांना 'रससिद्धान्त' ह्या पुस्तकाबद्दल अकादमी—पुरस्कार मिळाला आहे. **कर्तारसिंग दुग्गल** हे नांवही








मराठी वाचकांच्या कानावरून गेले आहे. कारण त्यांच्या काही कथांचे मराठी अनुवादही झाले आहेत आणि हिन्दी जाणणाऱ्या मराठी वाचकांना तर ते नांव सुपरिचित आहे. त्यांच्या मनात डॉक्टरेट मिळवावी असे होते. परंतु त्यांना ते जमले नाही. परंतु त्यांनी २२५ चे वर ज्या कथा लिहिल्या आहेत त्यांचा अभ्यास मात्र एखाद्या साहित्याच्या विद्यार्थ्याला डॉक्टरेट मिळवून देऊ शकेल. त्यांच्या कथांची प्रकृति आपल्याकडच्या नव कथेला बरीचशी जवळची आहे. त्यांच्या कथात लैंगिक दृष्ट्या कुचंबलेल्या, कांहीशा असाधारण प्रकृतीच्या, दबलेल्या भावनांच्या व्यक्तींचे चित्रण प्रामुख्याने आढळून येते. हे विश्व त्यांनी फार सूक्ष्मतेने पाहिलेले आणि मोठ्या साक्षेपाने टिपलेले दिसते. त्यांच्या **'इक चिट चनन दी'** ह्या कथासंग्रहाला यंदाचे साहित्य अकादमी ॲवॉर्ड मिळाले आहे. दुग्गल यांच्या कथांपूर्वी पंजाबी कथेत प्रामुख्याने घटना प्राधान्य व घटनानिवेदनाला महत्व होते. समस्यातही मुख्यत: धार्मिक—सामाजिक चित्रणाला महत्व होते. परंतु दुग्गल ह्यांच्या कथेने तंत्र आणि आशय ह्या दोन्ही बाबतींत क्रांति घडवून आणली. हेन्री जेम्स फ्रॉइड, ॲडलर वगैरेनी मानवी मनाच्या विविध संज्ञांबाबत पुरस्कारिलेल्या सिद्धांतानी वाङमयाच्या सूक्ष्मतेत फार मोठी भर घातली आहे. त्यातून कधीही न संपणारा असा विषयांचा सांठा साहित्यकारांच्या हाती दिला आहे. कर्तारसिंग दुग्गल ह्यांच्या कथात त्यांनी माणसाच्या मनाच्या सूक्ष्मातिसूक्ष्म संवेदनांचे आलेखन केले आहे. दुग्गल यांच्या कथांनी पंजाबी कथेला मास्टर कुखा, कुलसुम चौधरी, लेखना सिंग, बेगम शकील यासारख्या असंख्य व्यक्तिरेखा दिल्या, **'कॅरेक्टर स्टोरी'** ही त्यांची कथेला देन आहे. कांही कथात केवळ वातावरण निर्मिती आहे. तर काही कथातून केवळ संज्ञाप्रवाहांचा खेळच रंगविलेला दिसतो. कर्तारसिंग दुग्गल यांचा जन्म १९१७ त झाला. लाहोर येथील कॉलिजातून एम्. ए. ची पदवी संपादन केल्यावर ते रेडियोत समाविष्ट झाले. तेथे वावरतांना त्यांना त्यांच्या साहित्यातील अनेक व्यक्ति भेटल्या. मुस्लिम युवतीशी त्यांनी केलेल्या विवाहाने त्याना 'नवे जग' दाखविले. लैंगिक विषयावरच्या जादा भरामुळे पंजाबी साहित्य क्षेत्रात दुग्गल यांच्याविरुद्ध खूप वादळ माजले होते. आता ते शमले आहे. कारण कथेबद्दलचा एकूण दृष्टिकोनच आता बदलला आहे. आणि नव्या जाणीवांची दखल घेतली जात आहे. कवि म्हणून कीर्ति मिळविण्याची त्यांना कांक्षा होती आणि म्हणून त्यांनी 'बंद दरवाजे' व 'खंदे खंदे' हे संग्रह प्रकाशित केले. रेडियोवर त्यांनी असंख्य नाटके सादर केली. त्याशिवाय त्यांची १३।१४ कथा—पुस्तके प्रसिद्ध झाली आहेत. पंजाबी कथेच्या विकासातला हा महत्वाचा मानकरी आता भारत शासनाचा मानकरी झाला आहे. नवकथाकार दुग्गल यांजप्रमाणे बंगालमधील नवकाव्याचे थोर पाईक श्री. विष्णु डे यांनाही त्यांच्य **"स्मृति सत्ता भविस्यात"** ह्या काव्यसंग्रहाबद्दल यंदा साहित्य अकादमीचे पारितोषिक मिळाले आहे. टी. एस्. इलियट, एझरा पाऊंड व मार्क्स ह्यांच्या वाङमयाचा फार मोठा ठसा त्यांच्या कवितेवर उमटलेला आहे. वास्तवाचा वेध घेत पण विचार, जाणीवा आणि भावना ह्यांच्या संदर्भात त्या वास्तवाचे पृथ:करण करीत करीत विष्णु डे यांची कविता जन्म पावते. त्यांची चर्चा ती करीत नाही. तर त्यातून मनातील सूक्ष्म संवेदन शब्दरूप घेतात. काव्याचा निष्ठावंत अभ्यासक म्हणून डे प्रसिद्ध आहेत. व्हर्जिल, डांटे व शेक्सपियर हे त्यांचे फार आवडते लेखक कवि होत. त्यांचा हा व्यासंग केवळ अभ्यास करूनच थांबत नाही तर ४० ते ४५ युरोपीय कवींच्या कवितांचे अनुवाद त्यांनी केले आहेत. ह्यावरून तो क्रियाशील व्यासंग आहे हे ध्यानी येते. त्यात इलियटच्या कविताही येतात. त्यांच्या निबंधाचेही तीन संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. रूचि ओ प्रगति, साहित्येर, भविस्यात व एलोमेलो जीवन ओ शिल्पसाहित्य ही त्यांची नांवे! बंगालच्या ह्या सुपुत्राचा हा सन्मान साहित्य रसिकांना नि:संशय आनंद देईल.

साहित्याच्या ह्या साऱ्या मानकऱ्यांना आम्ही सुयश चिंतितो. त्यांचे अभिनंदन करतो.

**—आदित्य**

---

**( पान ५८ वरून —नाक )**

होणार नाही ! ते सुकेल—सडून जाईल. आणि तुम्हाला त फार त्रासदायक होईल. यापेक्षा तुम्ही आता हे नाक बसवू नका. फेकून द्यायला हवे आहे आता ते ! किंवा मी ते नेतो आणि माझ्या दवाखान्यात स्पिरीट ओतून एका बरणीत ठेऊन देतो ! एक चांगला नाकाचा नमुना आहे हा !

"फार शहाणे आहात ! जा चालते व्हा येथून ! नाहीतर तुमची गर्दन नाहीतर नाक उडवीन मी !"

★ ★

**मेजर** साहेबाना फार दु:ख झाले. नाक सांपडूनहि ते जागेवर बसत नाही? केवढी दु:खाची गोष्ट !

त्यांनी आपल्या भावी वधूस एक पत्र लिहून काढले. वैयक्तिक आपत्तीमुळे तिच्या वाढदिवसास हजर रहाता येत नाही याबद्दल दिलगिरी व्यक्त केली गेली. इतक्यात न्हावीदादा दिवाणखान्यात आले. मेजर साहेबांचे नाक त्याने हातात धरून नीट नीरखून पाहिले. तुटलेल्या नाकाबद्दल न्हावीदादा आणि मेजर साहेब दोघांनी हळहळ दाखविली आणि न्हावीदादाने [illegible]यासाठी म्हणून खूपसा साबणाचा फेस मेजरच्या



चेहेऱ्यावर पसरला. त्या साबणाच्या फेसावरच न्हाव्याने नाक जागेवर बसवले आणि आश्चर्य म्हणजे ते नीट पक्के रुतून बसले. दाढी संपली तेव्हा न्हाव्याने मेजरच्या हातात छोटा आरसा दिला आणि तो म्हणाला, "बघा सरकार ! काय अगदी फस्कल्लास दाढी केलीया !" मेजर साहेब खट्टू मनाने म्हणाले, "आयव्हान ! अरे कशाची दाढी आणि कसले काय ? नाकच नाही तर चेहेऱ्याची शोभा काय? "

"नाही—नाही—सरकार ! बघा तरी !"

मेजरने दचकून आरशात पाहिले तर नाक जागेवर ठीक आहे. हातांनी चापसून पाहिले तरी नाक ठीक जागेवर पक्के बसलेले !

दोघेहि हातात हात घालून दिवाणखान्यात नाचत पिंगा घालू लागले !

जगामध्ये केव्हा केव्हा मोठ्या अकल्पित घटना घडतात. त्या घटना उकलून काढता येणे खरोखरीच अशक्य असते ! परंतु क्वचित केव्हातरी अशा घटना घडतात हे मात्र खरे ! ●●●

[सुप्रसिद्ध रशियन लेखक **निकोलाई गोगोल** यांच्या The Nose या कादंबरीचा स्वैर अनुवाद]

# मृत्योर्पुराणः । द्वितीयोध्यायः ॥



डॉ. एच. जे. भाभा

"मृत्यु मोकाट सुटला आहे. संक्रांत आली आहे. ही संक्रांत मोठ्या माणसांचे बळी घेत, थैमान घालीत संचार करते आहे. तो फू: करतो आणि जगांतील चांगली, गुणी, कर्तबगार माणसे जगाच्या पटावरून उडून जात आहेत. सावधान!" असे इशाऱ्याचे शब्द मी गेल्या अंकातल्या दीपमालेमध्यें लिहिले. त्याची शाई वाळली न वाळली तोंच मृत्यूनें आणखी मोठी झेंप घेतली. आकाशातून तो धांवत धांवत आला आणि मॉंट ब्लॅंकच्या हिम-शिखरावर त्याने आपले पाश फेकले. त्या पाशांत अडकला भारताचा एक थोर सुपुत्र! एक कल्पक, कर्तबगार, गुणी, संघटना कुशल, कार्यकुशल, सततोद्योगरत, दूरदृष्टीचा, संशोधक प्रवृत्तीचा, हुशार पण तितकाच रसिक व कलाप्रेमी सुपुत्र! ज्याच्या मृत्यूनें मृत्यूच शरमला असेल, ज्याच्या मृत्यूनें शास्त्र रडले असेल. ज्याच्या मृत्यूने सृष्टीतल्या साऱ्या अणूंना अश्रूंचे लोट आले असतील. ज्याच्या मृत्यूने जगांतली संशोधक शक्ति–विवेचक बुद्धि हीही शोकमग्न झाली असेल असा सुपुत्र! त्या सुपुत्राचे नांव डॉक्टर होमी जहांगिर भाभा! जगांत माणसे येतात, जन्म आणि मृत्यु यांच्या मधल्या जीवनाच्या पंचवीस–तीस–चाळीस वर्षांच्या पट्ट्यांत कांहींतरी 'जीवन' नांवाचं जगण्याचा प्रयत्न करतात. आणि मरून जातात. पण ते जीवनच असते कां? कुसुमाग्रजांनी एका कवितेत ह्या असल्या जीवनासंबंधी हा तर 'जीवित-भास' असे म्हटले आहे. ते म्हणतात—

कण क्षुद्र घेऊनी सुखदुःखाचे हातीं धापावत आम्हीं जीवन मार्गावरती
पर्णापरि वाऱ्यावरती हलतो, डुलतो जों धुळींत लाभे अखेरची विश्रांति.

अशी जीवने मृत्यु झोडपीत गेला तरी त्यांची खंत 'जीवनाला' वाटत नाहीं. पण जगाला खऱ्या अर्थानें 'जीवन' प्रदान करणाऱ्या व्यक्ति जीवनपटावरून उडून गेली कीं उरतात खंती! दाटतो काळोख, पसरते निराशा! मन करूं लागते आक्रोश! स्वप्ने वेध घेत फिरूं लागतात नव्या सृजनाचा! नव निर्माणाचा! नव्या प्रतिभावंतांचा!

डॉ. होमी जहांगीर भाभा ह्यांचा मृत्यु हा एका व्यक्तीचा मृत्यु नाहीं. भारताच्या स्वातंत्र्योत्तर काळांतल्या एका नव्या युगाच्या निर्मात्याचा तो मृत्यु आहे. केवळ भारताच्याही नव्हे तर जागतिक संशोधन क्षेत्रांत मान्यता पावलेल्या एका सृजनशील, नवनिर्माण–क्षम प्रतिभावंताचा तो मृत्यु आहे. एका क्रियाशील व्यक्तीत्वाचा तो अंत आहे. डॉ. भाभा ह्यांना संगीताचे व चित्रकलेचे फार प्रभावी आकर्षण होते. पण शालेय जीवनांत त्यांना विज्ञानाची गोडी वाटूं लागली. वयाच्या १७ व्या वर्षी त्यांनीं केंब्रिज विद्यापीठांत प्रवेश केला. १९३१ मध्यें लंडन येथील रॉयल सोसायटीचे फेलो म्हणून त्यांना स्थान मिळाले. १९३४ मध्ये वयाच्या २५ व्या वर्षी त्यांना 'डॉक्टोरेट' मिळाली व १९३६ साली त्यांच्या "पदार्थ विज्ञान शास्त्रांतील मूलकणांचे सिद्धांत" ह्या प्रबंधाबद्दल ॲडाम्स पारि-तोषिक मिळाले. केंब्रिज फिलॉसॉफिकल सोसायटीचे पारितोषिकही मिळाले. भारतात आल्यावर बंगलोरला त्यांनीं "इंडियन इन्स्टिटयूट ऑफ सायन्समध्यें रीडर म्हणून नेमणूक झाली. पण केवळ ॲप्लाइड फिजिक्सवर भर देऊन मौलिक संशोधन कार्य करता येणार नाहीं अशी त्यांची धारणा असल्याने त्यांनीं 'टाटा इन्स्टिटयूट ऑफ फंडामेंटल रिसर्च' ह्या संशोधन कार्य करणाऱ्या संस्थेची स्थापना केली. भारताच्या तरुण पिढीबद्दल, मित्र्यातल्या संशोधन क्षमतेबद्दल त्यांच्या मनांत उदंड विश्वास बसत होता. आणि ह्या बुद्धीला जर वाव मिळाला तर वैज्ञानिक दृष्टया भारत जगांतल्या कुठल्याहि देशाइतकाच मोठा आहे हे सिद्ध करून दाखविता येईल अशी खात्री बाळगून त्यांनी तरुण संशोधकांना हातीं धरले आणि आजचे ॲटमिक एनर्जी केंद्र ही त्यांच्या ह्या दूरदृष्टिचेच फलित आहे. पंडित नेहरूंच्या मनांत विज्ञाना विषयी आणि वैज्ञानिक प्रगति विषयी प्रगाढ श्रद्धा होती आणि डॉ. भाभा ह्यांच्या ठिकाणच्या कर्तृत्वा-विषयीं त्यांच्या मनांत विश्वास होता. ह्या विश्वासातूनच डॉ. भाभा ह्यांना संपूर्ण अधिकार बहाल करण्यांत आले. आणि त्या अधिकारामुळेंच डॉ. भाभा ह्यांनी ह्या देशाला जगांतील एक प्रमुख अणुकेंद्र म्हणून कीर्ति मिळवून दिली. शांततेसाठीं अणूचा उपयोग झाला पाहिजे हीच त्यांचीही भूमिका होती. परंतु जगाला त्यांनी असेंही सिद्ध करून दाखविले कीं, वेळ आली तर आम्हींही 'अणु-बॉंब' तयार करून दाखवूं शकतो. त्यांची अशी मनोमन श्रद्धा होती. कीं, ज्यांच्या जवळ अणु-बॉंब्स नाहीत ते राष्ट्र जगांत दुय्यम दर्जाचे राष्ट्र म्हणूनच गणले जाईल. भारताला त्यांनी अण्वस्त्रदृष्टया स्वयंपूर्ण करण्याइतकी संशोधकक्षमता सिद्ध करून

अनुक्रमणिका






दाखविली होती. सहकाऱ्यांची योग्य पारख, कामाचा तुफानी उरक, संघटनात्मक कार्यक्षमता, दूरदृष्टी हे गुण अंगी असल्याने त्यांनी संशोधकांची एक नवी पिढीच भारताला दिली आहे. हे संशोधनही अणुविज्ञानशास्त्र, गणित शास्त्र, भू-शास्त्र, जीवनपदार्थ विज्ञान-शास्त्र, इत्यादि विविध क्षेत्रांत चालू आहे. ४ ऑगस्ट १९५६ ला तुर्भे येथे पहिली अणुभट्टी सुरू झाली. तिचे नांव अप्सरा! त्या भट्टीपासून वीज पुरवठा करता आला पाहिजे असा आग्रह त्यानी धरला. त्यामध्येंही त्यांची कल्पकता व दूरदृष्टि दिसून येते. त्या प्रयत्नातूनच तारापूरला कारखाना निघाला आहे. अणूपासून वीज निर्माण करण्यासाठीं डॉ. भाभा ह्यांनीं स्वकर्तृत्वामुळें जागतिक विज्ञान क्षेत्रांत मानाचे पान पटकावले होते. संयुक्त राष्ट्र संघटनेच्या विविध वैज्ञानिक समित्यांवर त्यांची नियुक्ति झाली होती. १९५५ मध्यें जिनीवा येथे भरलेल्या "ॲटम फॉर पीस" परिषदेचे अध्यक्षपद त्यांना देऊन जगाने त्यांचा गौरव केला.

डॉ. भाभा वैज्ञानिक संशोधक होते तरीही ते धर्मपरायण होते. त्यांना सृजनांचे आकर्षण होते. कलेतल्या नव्या प्रयोगांचे ते चाहते होते. रसिक होते. त्यांच्या आवडीच्या विषयांत विज्ञानाबरोबरच वाङ्मय, संगीत, चित्रकला, शिल्पशास्त्र, बागकाम आणि फुले यांचा समावेश होत-होता. प्रसन्न, रसीले व्यक्तित्व त्याना लाभले होते. त्यांनी इंटरनॅशनल कौन्सिल ऑफ सायंटिफिक युनियन्सच्या त्यांच्या शेवटच्या जाहीर भाषणांत आपले अनुभवी विचार मांडले आहेत ते पुढील प्रगतीच्या दृष्टीनेही उपकारक ठरतील. भाभा म्हणाले—

"The administration of Scientific Reserch and Development is an even more subtle matter than the administration of industrial enterprises and I am convinced that it can not be done on the basis of borrowed knowledge. It must necessarily be done, as in the technologically advanced countries, by scientists & technologists themselves."

डॉ. भाभा ह्यांनी अणुकेंद्राची धुरा ह्या भूमिकेनेच वाहिली, समर्थपणें वाहिली. आज त्या क्षेत्रांत भारताने नांव कमवायला सुरूवात केली आणि हा आघात कोसळला आहे. डॉ. भाभांचा मृत्यु हा शास्त्रींच्या मृत्युपाठोपाठ आल्याने दुःखाची दारुणता अधिक वाढली आहे. आधुनिक भारताचा 'सोनेरी' इतिहास लिहिणारे हे दोन शिल्पकार नव्या वर्षाच्या साक्षीने मृत्यूने गिळून टाकले आहेत. प्रतिदिनी नव्या अपघातांच्या, मृत्यूंच्या वार्ता कानीं येताहेत. समृद्ध जीवने, तेजस्वी जीवने, प्रतिभेचा स्पर्श झालेली जीवने जाळीत मृत्यू मोकाट सुटला आहे. महापुरुषांची आत्यंतिक गरज असलेल्या ह्या देशाला डॉ. भाभांच्या मृत्यूने महान टोला मारला आहे. मृत्यूच्या अण्वस्त्राने जगांतला एक श्रेष्ठ अणुशास्त्रज्ञच जणुं खाऊन टाकला आहे. डॉ. भाभांच्या पवित्र व प्रेरक स्मृतीला अभिवादन!

—सारस्वत

( पान १० वरून – आम्ही सौजन्यांत आहोत )

एकीकडे आणि मंदा व तिची आई दुसरीकडे अशी डबलसची भांडणक्रीडा चालते... अगदीच काही नसलं तर नानी विरुद्ध समस्त शेजारणी नाहीतर नानी एकटीच भांडते.

**सदा** : एकटचा?

**नाना** : हो एकटी— अगदी एकटी भांडते—आता मला सांग अशा कौटुंबिक कोलाहलात एकनाथासारखा शांत वृत्तीचा संतशिरोमणी सुद्धां कोपायमान झाला असता — मग आम्ही तर काय शांतही नाही आणि संतही नाही.

सदा : पण नाना तुम्ही एकटे शांत असून काय उपयोग? नानीनी सुद्धां थोडं समजुतीनं घ्यायला पाहिजे (नानी येत असताना हे वाक्य त्याना ऐकू येते.)

**नानी** : सद्या—लाज नाही वाटत तुला असं बोलायला? मेल्या मीच आजवर समजुतीनं घेतलं म्हणून तर हे घर टिकलं आहे नाही तर केव्हाच तीन तेरा झाले असते या घराचे आणि वेरक्यांच्या घराण्याचे. माझी माहेरची पुण्याई म्हणून वेरक्यांचं हे भांडकुदळ घराणं टिकून आहे अजून... आणि तुम्ही मेल्यानो अशी तेलं ओतता दुसऱ्याच्या घरांत येऊन —

**नाना** : अग अग सौजन्य सुटतय्... सौजन्य सुटतय्...

**सदा** : नानी, मला वाटलं तुम्ही आंत आहात म्हणून मी तसं चुकून म्हणालो. मी माझे शब्द मागे घेतो.

**नानी** : (एकदम सौजन्यात जाऊन) छे; छे: सदाशिवरावभाऊ.... मीच माझे कठोर शब्द मागे घेते. मी सौजन्यात असताना असं बोलायला नको होतं. जिभेला सौजन्याची चव नवी असल्यामुळे असं झालं.

**सदा** : नाना... नाना अहो तुमच्या घरात क्रान्तीच झालेली दिसते.

**नाना** : अरे ही क्रान्ति नव्हे शांती आहे, अरे ते रेल्वेतले भास्करराव कडू आहेत ना— त्यांनी हा मार्ग दाखवला मला. ते म्हणाले नानासाहेब तुम्ही रेल्वेचं अनुकरण करा की, गाडी रुळावर आलीच पाहिजे. त्यांच्या रेल्वेत म्हणे दरसाल सौजन्य सप्ताह पाळतात.

**नानी** : म्हणूनच रेल्वेच्या गाड्या नेहमी रुळावर असतात म्हणे!

**सदा** : नाना, खरं सांगू का? रेल्वेप्रमाणे नळावरही सौजन्य सप्ताह पाळला पाहिजे.

**नाना** : नळावर?

**सदा** : नाना, आपल्या देशात सर्वात जास्त भांडणं कुठं होतात? रेल्वेत आणि सार्वजनिक नळावर.

**नाना** : तसं म्हणशील तर तिसरं ठिकाण म्हणजे आमचं घर— पुष्कळ विचार केला आणि काल ठरवलं— म्हटलं पाहू या हा सौजन्याचा उपाय करून. लगेच आमच्या कुटुंबातील मंडळीची बैठक








घेतली— हो सौजन्यासारखी गोष्ट सगळयांच्या संमतीने व्हायला पाहिजे.

**सदा** : मग बैठकीत तुम्ही भाषण केलंत —

**नाना** : अरे, मला या पोरानी अध्यक्ष केलं आणि भाषणं त्यानी केली. बोलणाऱ्याचं तोंड थोडंच धरता येते ? सगळे एकदम बोलत होते. मला वाईट एवढंच वाटत होतं की, सौजन्यामास कसा पाळायचा याची चर्चा करतांना सगळीजणं सौजन्य सोडून बोलत होती.

**सदा** : म्हणजे अभूतपूर्व बैठक झाली म्हणायची ?

**नाना** : त्यामुळं मला घसा खरवडून खरवडून सौजन्याचं महत्त्व पटवावं लागलं.

**सदा** : पण पटलं का सर्वांना शेवटी ?

**नाना** : तसा ठरावच केला आम्ही. एक महिनाभर सौजन्यमास पाळायचा – घरात आवाज चढवायचे नाहीत. भांडायचं नाही. शेजाऱ्यांशी प्रेमानं आणि सौजन्यानं बोलायचं भाषेत. सौजन्य, सुसंस्कृतपणा आणि संस्कृतपणा ठेवायचा आणि कुणाचं सौजन्य सुटू लागलं तर एकमेकांनी एकमेकांना सावरायचं... अवघड आहे पण आम्ही निर्धार केला आहे.

**सदा** : अस्सं ! म्हणून तुम्ही सर्वजण आज सौजन्यशील झाला आहात—

**नाना** : हो, ना. आज सकाळी सूर्योदयापासून सौजन्यानं आमच्या घरात मुक्काम ठोकला आहे. सदाशिवा, तुला सांगतो सूर्योदयापासून आपण वाल्मिकीच्या किंवा कण्वमुनीच्या आश्रमांत असल्यासारखं वाटतं आहे–सगळं घर कसं लोण्यात शिरल्यासारखं वाटतं आहे–प्रत्येकाचे शब्द लोण्यात बुचकळून काढलेले, प्रत्येकाच्या स्वरयंत्रात जसं काही लोणी सोडलेलं वा – ! वा ! सदाशिवा, माझी तर खात्रीच झाली आहे की, जगांत सर्वात श्रेष्ठ गोष्ट कोणती असेल तर ती सौजन्य ! माणसाचं दुसरं काहीही सुटलं तरी चालेल पण सौजन्य सुटतां कामा नये —

**नानी** : अरे मी तर भांड्यांशी सुद्धां सौजन्यानं वागते आहे—

**नाना** : हो पण तुम्ही सदाशिवासाठी चहा करणार होता–

**नानी** : अय्या विसरलेच मी... आत्ता आणते... (आत जातात)

**नाना** : तेव्हा सदाशिवा, आमचं घर सध्या संपूर्ण सौजन्यात आहे.

**सदा** : असा फरक हवाच अधून मधून नाना–बरं वाटतं.

**नानी** : (येतात) ऐकायचं झालं का ?

**नाना** : होय.

**नानी** : वरचे मंडलेकर आहेत ना ?

**नाना** : त्यांचं काय झालं ?

**नानी** : त्यांचं काहीही झालेलं नाही — पण त्यांनी त्यांच्या खिडकीतून बाहेर फेकलेला सगळा कचरा आपल्या खिडकीतून आत आला—

**नाना** : पुन्हा कचरा आला ? ही मला वाटतं सत्तेचाळीसावी खेप. . . (सौजन्य सोडून उठतात) हरामखोराला इतक्या वेळां बजावलं— सौजन्य नव्हते तरी सौजन्यानं सांगितलं....तरी त्या नराधमानं पुन्हा कचरा टाकला ना ? आता एकच मार्ग आहे— आपल्या डब्यातला असेल नसेल तो कचरा माझ्याजवळ दे— आपल्या डब्यात कमी असेल तर शेजाऱ्यांच्या डब्यातील गोळा करून आण–

**सदा** : नाना, अहो कचरा कशाला ?

**नाना** : कशाला ? इतका सगळा कचरा मी घेऊन जातो आणि त्यांच्या बैठकीच्या खोलींत उधळून येतो म्हणजे त्याला कळेल तरी घरांत कचरा पडल्यावर कसं वाटते तें ? हरामखोर साले—

**नानी** : अहो असं काय करताय ? सौजन्य कसं सोडता तुम्ही लगेच?

**नाना** : (पुन्हा सौजन्यात) हो– हो, चुकलंच जरा माझं–मग असं कर— फक्त मंडलेकरांचाच तेवढा कचरा गोळा करून पुडीत बांधून दे–मी तो परत देऊन येतो त्यांना. दुसऱ्याची काडी सुद्धा नको आपल्याला— अगदी कचऱ्यातली सुद्धां नको—आण पाहू पुडी बांधून चटकन–आणि विश्राम गेला का ?

**नानी** : हो गेला मघाशीच . . .

**नाना** : मग तेवढी पुडी लौकर बांधून दे. . . उगाच उशीर नको–

**नानी** : आणते हं. . . (आत जाते)

**नाना** : पाहिलंस सदाशिवा, सौजन्य म्हणजे किती यातायात आहे ती ?

**सदा** : ते दिसतेच आहे मला... सारखं सौजन्य सुटतं आहे तुमचं.

**नाना** : नव्यानं धोतर नेसायला लागल्यावर कसं होतं माणसाचं ? तसच सौजन्याचं आहे–सारखं धोतर सावरावं लागतं—अरे ही सुद्धा एक साधनाच आहे.

**सदा** : कसली धोतराची ?

**नाना** : धोतराची नाही सौजन्याची !

**नानी** : (येतात) इकडनं ऐकायचं झालं का ?

**सदा** : (मोठ्यानं हसतो) इकडनं ? वाह्वा !

**नाना** : अरे सकाळपासून हे असं चाललंय्—इकडनं तिकडनं येते आणि म्हणते इकडचं ऐकायचं झालं का ?

**नानी** : सौजन्य म्हणून बोलते हो मी तसं—इकडनं थट्टाच करायची असेल तर—

**नाना**: छेः छे; थट्टा कशी करेन मी ? तिकडनं सांगावं–इकडनं ऐकायची तयारी आहे.

**नानी** : कळलं का ? शेजारच्या देसायानी खरकटं पाणी आपल्या खिडकीवर टाकलं—सगळी खिडकी खरकटी झाली आहे.

**नाना** : (रागवून) खरकटं पाणी ? कमाल आहे शेजाऱ्यांचीही आमचं घर म्हणजे काय मोरी वाटली का गटार वाटलं त्यांना ?

**नानी** : असं रागवू नये—त्यांना सांगावं नीट समजावून—

**नाना** : (रागात) ही आठवी खेप पाणी टाकायची.

**नानी**: पाणी टाकायची आठवी—पण खरकटं पाणी टाकायची पाचवी खेप———

**नाना** : (रागातच) मला सांग सदाशिवा, ह्याला पाजीपणा म्हणायचं नाही तर काय म्हणायचं दुसरं ? अरे ह्या सौजन्यानं घोटाळा केला आहे—नाहीतर आज ह्या देसायाची मुंडी मुरगाळून मोकळा झालो असतो—

**नानी** : पण त्यांना सांगून तरी यावं एकदा——

**नाना** : काय? मुंडी मुरगाळून टाकीन म्हणून?

**नानी** : खरकटं नीट बघून टाकीत जा म्हणून——

**नाना** : ठीक आहे—सांगून येतो. बैस सदाशिव, मी आतां येतो. (जातात)

**सदा** : नानी, सौजन्याचा फारच व्याप झालाय तुम्हाला एकंदरीत–

**नानी** : अरे सकाळपासनं सौजन्य सांभाळता सांभाळता दम उखडला बघ आमचा. . . . . .लोकच वाईट आहेत बघ. . . . . . . सौजन्याचं महत्त्व आपल्याला, त्यांना काय त्याचं ? एखाद्याच्या सौजन्याचा फायदा घ्यायचा म्हणजे किती ?






**मंदा** : नानी, त्या मानानं तुम्ही इतकं सौजन्य सांभाळता हे आश्चर्य म्हणायचं?

(तेवढ्यांत मंदा, १७–१८ वर्षाची देखणी व चुणचुणीत मुलगी तावातावानं येते)

**मंदा** : मेल्याना खेटरानी मारलं पाहिजे चांगलं. . . जिभा उपटून काढल्या पाहिजेत मुळासकट त्यांच्या.

**सदा** : कोण मंदा ?

**नानी** : अग कार्टे पण सौजन्य सोडायला काय झालं इतकं ?

**मंदा** : काय झालं? आई, समज तुला वाजाची पेटी वाजवायचा नाद आहे—आणि तू नेहमी पेटी वाजवतेस आणि तुला जर कुणी म्हटलं की 'यार आपण वाजाच्या पेटीचा जन्म घ्यायला हवा होता म्हणजे एका माणसाच्या सारखं जवळ बसायला मिळालं असतं'—तर तुला काय वाटलं असतं ?

**नानी** : तुझ्या वडलानी असं म्हटलं असतं तर कांही केलं नसतं मी—पण दुसऱ्या कुणी म्हटलं असतं तर खेटरानी मारलं असतं मी त्याला——

**मंदा** : म्हणूनच माझं सौजन्य सुटलं—

**सदा** : कोण म्हणाला तुला असं ?

**मंदा** : अरे तो वासू खालच्या मजल्यावरचा. मी येत होते आणि तो तिथेच बसला होता टोळभैरव जमवून. मला पाहताच म्हणाला की, वाजाच्या पेटीचा जन्म घ्यायला हवा होता म्हणून—

**नानी** : मेल्याला म्हणावं कचऱ्याची पेटी व्हायची लायकी तुझी—वाजाची पेटी होतोय म्हणे ?

**सदा** : फारच वाह्यात दिसतोय पोरगा !

**नानी** : पण कार्टे तूं ऐकून घेतलंस मुकाट्यानं?

**मंदा** : मी बोलल्याशिवाय सोडते की काय? मी चागलं मोठ्यानं म्हणाले, त्यापेक्षा खेटराचा जन्म घे म्हणजे पाय तरी चाटायला मिळतील सारखे.

**नानी** : छान केलंस—तेच पाहिजे ह्या लांडग्यांना—खेटराचीचं पूजा पाहिजे असल्या चांडाळांना—मग गप्प बसला असेल मेला—

**मंदा** : मी जिन्यावर चढले तशी म्हणाला मोठ्यानं, नाही हिला माझी खेटरं पुसायला लावली तर नांवाचा वाश्या नव्हे.

**नानी** : अग कार्टे खाली उतरून, चांगला मोठा धोंडा आणून घालायचास त्याच्या टाळक्यात. मेल्यांना लाजा म्हणून नाहीत—

**नाना** : (येता येता) हरामखोर लेकाचा—वर तोंड करून सांगतोय पुन्हा मला—म्हणे तुम्हाला सौजन्याची संवय लागावी म्हणून मुद्दाम खरकटं पाणी टाकलं तुमच्या खिडकीत. मी त्याला चांगली समज दिली. म्हटलं, मी सौजन्यात आहे म्हणूनच तुझी गय करतो यावेळी—पण हा सौजन्यमास संपू दे एकदा मग दाखवतो तुला—

**नानी** : खालच्या मजल्यावरच्या त्या वाश्याचंही एकदा कंबरडं मोडलं पाहिजे चांगलं——

**नाना** : त्यानं काय केलं ?

**नानी** : मंदीला म्हणाला म्हणे की, वाजाच्या पेटीचा जन्म घेतला पाहिजे म्हणजे सारखं तिच्याजवळ बसता येईल.

**नाना** : (रागाने) कोण ? तो वाश्या म्हणाला असं ? त्याचा बाप आला पाहिजे त्याला वाजाच्या पेटीचा जन्म घ्यायला—तेही कार्टं आगाऊच आहे—सौजन्यमास संपल्यानंतर त्याचीही तंगडी मोडून टाकली पाहिजे एकदा—मंदे—एक यादीच करून ठेव—नंतर कुणाकुणाचं काय करायचं ते लिहून ठेवलेलं बरं. हलकट लेकाचे, आम्ही सौजन्यात आहोत हे पाहून मुद्दाम चावटपणा करतात काय ? याद राखा म्हणावं—ह्या नाना वेरक्याशी गाठ आहे—अरे सौजन्य काय एक महिन्यापुरतं आहे पण मी मात्र कायमचा आहे.———

(तेवढ्यांत बाहेर आरडा ओरडा–गलका—सर्वजण बाहेर जाऊं लागतात. केस व कपडे अस्ताव्यस्त असलेला विश्राम खांद्यावर वाश्याला घेऊन येतो. वाश्या हा एक मरतुकडा पोरगा—त्याचेही केस अस्ताव्यस्त—कपडे फाटलेले—तोंडावर माराच्या खुणा—दमलेला. विश्रामही मारामारीतून आलेला. विश्राम त्वेषाने आत येतो आणि वाश्याला दणकण खाली आपटतो. सर्वजण ह्या प्रकाराकडे आश्चर्याने वघत आहेत.)

**विश्राम** : (वाश्याच्या उरावर बसून) हरामखोर–(थप्पड लगावतो)

**सदा** : अरे विश्राम——विश्राम——अरे सौजन्य——सौजन्य–

**विश्राम**: सौजन्य गेले खड्डयात————

**सदा** : अरे झालं तरी काय असं ?

**विश्राम** : विचार त्या हलकटाला———

**नाना** : अरे पण आपलं सौजन्य चालू आहे.———

**विश्राम** : मला म्हणतो सुलोचनेला सारखा एकटाच घेऊन काय फिरतोस ? आम्हालाही जरा चान्स दे—तिलाही एकदोनदा असाच अगाऊपणानं बोलला. परवा मी पाकीट विसरलं म्हणून परत आलो तो मलाही म्हणाला तसं—किती ऐकून घ्यायचं मी ? मारलं त्याला आणि आणला उचलून इथं—खून करणार आहे मी त्याचा. . . . . . . . .

**मंदा** : मलासुद्धा खून करायचा आहे त्याचा. दोघं मिळून करूया खून–

**विश्राम** : तूं मधे येऊ नकोस मंदे—मीच एकटा करतो खून त्याचा —(त्याचा गळा धरतो) नराधमा, घे देवाचं नांव आणि हो मरणाला तयार———

**नानी** : (नानाना) अहो– अहो—विश्रामला आवरा—विश्रामला आवरा———

**नाना** : विश्राम—विश्राम—असला वेडेपणा करू नकोस—ऐक माझं——

**सदा** : अरे विश्राम (विश्रामला धरून बाजूला ओढूं पाहतो)

**विश्राम** : सोड सदाशिव तूं—नाना, नानी तुम्ही पुढं येऊ नका–मी खून करणार म्हणजे करणार—

**नानी** : (रडकुंडीला येऊन) अहो—नुसते बघत काय उभे राहिलात——तो खून करतोय—तुम्ही काही तरी करा—

**नाना** : आता काय करू मी ?)

**सदा** : (पुन्हा विश्रामला ओढू वेड लागलं नय का काय तुला विश्राम ? जरा ऐकून घे आमचं—

---








**विश्राम** : मला माहित आहे—तुम्ही सर्वजण मला खून करू नकोस म्हणूनच सांगणार—

**नाना** : अरे—असं नाही सांगत आम्ही तुला———

**मंदा** : विश्राम खून केलाच पाहिजेस तू———

**नानी** : मंदे कार्टे—तू बाजूला हो आधी—विश्राम—

**नाना** : अरे तूं खून कर पाहिजे तर आम्ही नको म्हणत नाही–

**मंदा** : नाना—आ हो नाना—आ ऽ हो काय सांगताय तुम्ही त्याला भलतंच काही तरी——

**नाना** : बरोबर तेच सांगतो आहे—विश्राम तूं जरूर खून कर त्याचा–पण माझं ऐक—आज सकाळपासूनच आपला सौजन्यमास सुरू झाला आहे त्याची सुरूवात अशी रक्तानं व्हायला नको आहे मला———मलासुद्धा अनेकांचे खून करावेसे वाटतात—पण खून हा नेहमी विचारपूर्वक केला पाहिजे—असा घाईघाईने केलेला खून हा खूनच नव्हे—! आपला हा सौजन्यमास संपूदे—आपल्या घरात घेतलेल्या सौजन्यव्रताचं उद्यापन होऊं दे—मग तू त्या वाश्याचा एकदा नव्हे दहादा खून केलास तरी मी तुला शब्दानेही बोलणार नाही— उठ—ह्या सौजन्य काळांत खून करणं शोभत नाही. आपल्या घरासाठी—आपल्या कौटुंबिक ठरावासाठी खुनाची तारीख पुढं ढकल—अरे फाशीची शिक्षा सुद्धां पुढं ढकलतात मग खुनाची तारीख पुढं ढकलायला काहीच हरकत नाही.

**विश्राम** : (वाश्याच्या उरावरून उठून बाजूला होतो.) ठीक आहे नाना——सौजन्यासाठी मी खुनाचा विचार पुढं ढकलतो.

**नानी** : किती शहाणा आहे माझा विश्राम—अरे मला सुद्धां वाटलं होतं क्षणभर की घरातला वरवंटा आणून ह्या मेल्याच्या नाका-वर हाणावा—पण सौजन्याची आठवण झाली म्हणून गप्प बसले.

**सदा** : पण विश्राम तू मारामारी केलीस ना आधी ?

**विश्राम** : होय—पण सदाशिव केवळ सौजन्यामुळं मी खुनाची तहान मारामारीवर भागवली आहे हे मात्र विसरू नकोस—सौजन्यमास नसता तर आतापर्यंत मी पोलीस ठाण्यावर गेलो असतो आणि हा वाश्या स्मशानात पोचला असता—नाना मी काय करू ह्या वाश्याचं आता ?

**नाना** : सध्या काहीही करायचं नाही—त्याला सोडून दे—आपल्या सौजन्याचा त्यालाही फायदा मिळाला पाहिजे.

**विश्राम** : (वाश्याच्या कमरेत लाथ मारून) उठ. हलकर्ट माणसा चालायला लाग—तुझा खून मी एक महिनाभर पुढं ढकलला आहे (वाश्या मोठ्या कष्टानं उठतो आणि घडपडत, झोकांड्या खात निघून जातो)

**नाना** : पाहिलंस सदाशिव, सौजन्यामुळे दोन जीव वाचले—तो वाश्या आणि विश्राम—सौजन्याचं महत्त्व आता तरी पटलं ना तुला ?

**विश्राम** : (गुर्मीत) नाना, हा सौजन्यमास संपला रे संपला की–

**नाना** : मीच वाश्याचा खून करीन———

**नानी** : आणि विश्राम तू त्या वरच्या मंडलेकरांचा नाहीतर पलिकडच्या देसायांचा खून कर—मेले सारखे छळत असतात आपल्याला.

**नाना** : हे पहा नानी, मंडलेकर आणि देसाई काय विश्रामच्या बरोबरीचे आहेत ? त्या दोघांची जबाबदारी माझ्यावर आहे. विश्राम, तू त्या दोघांना हात लावायचं काम नाही————

**विश्राम** : का ? मी कुणाचा खून करायचा हे ठरवणारे तुम्ही कोण ?

**नाना** : विश्राम, कुणाला बोलतो आहेस तूं ?

**विश्राम** : तुम्हाला—वाश्याचा खून तुम्ही करणार—मंडलेकर देसायांचा खूनही तुम्हीच करणार? मग मी काय करूं ! नाही नाना, सर्व खून मी तुमच्यावर टाकायला तयार नाही.

**नाना** : विश्राम लहान तोंडी मोठा घास घेणं बरं नव्हे. मी या घरातला कर्ता पुरूष आहे—मी सांगेन तसच झालं पाहिजे.

**नानी** : मी सांगते तुमच्या हातनं काही व्हायचं नाही. मंडले-करानी सत्तेचाळीस वेळा कचरा टाकला आणि देसायांनी आठ वेळा पाणी टाकलं त्यातलं पाच वेळां खरकटं पाणी टाकलं—काय केलंत तुम्ही ? ते काही नाही. विश्राम, मंडलेकर आणि देसाई यांचा खून तूच केला पाहिजेस————

**नाना** : नाही——नाही——नाही——माझ्यावर तुझा एवढा विश्वास नाहीं ? तू कोण बायको आहेस की वैरीण ?

**नानी** : कुणाला बोलता आहात तुम्ही—मला ?

**नाना** : हो भीति आहे का काय तुझ्या बापाची !

**विश्राम** : नाना, तोंड सांभाळून बोला—माझ्या मातेबद्दल असं बोललेलं मला खपायचं नाही.—

**नाना** : मी बाप आहे तुझा——

**विश्राम** : बाप असलात तर बाहेर—घरात काय त्याचं ?

**नाना** : थोबाड फोडीन मी तुझं ? मला उलट उत्तर देतोस ?

**मंदा** : नाना—————

**नानी** : मंदे———

**नाना** : विश्राम.

**विश्राम** : मी जुमानीत नाही कुणाला———

(विश्राम, नाना, नानी, मंदा, सर्वजण एकदम बोलू लागतात—जोरजोरानं एकमेकावर ओरडतात. सदाशिव कानांत बोटे घालून बसतो–भांडण चढत जाते आणि मग मात्र सदाशिव ताडकन उठतो)

**सदा** : नाना—नानी—विश्राम—अरे सौजन्यमास–सौजन्यमास–अजून एक दिवससुद्धा पार पडलेला नाही–अरे काय चालवलं आहेत तुम्ही हे ? नाना—अहो नाना, तुम्ही तरी विचार करा—नानी—नानी अहो ऐका जरा—

**नाना** : कुणाला सांगतोस तूं ? मला ? सौजन्याच्या गोष्टी मला सांगतोस तूं ?

**सदा** : अहो, इतका वेळ तुम्हीच मला सांगत होता—आता मी थोडीशी तुम्हाला सांगतो—(दरम्यान त्यांचे आपसातील भांडण चालूच आहे) सदाशिव प्रत्येकाच्या जवळ जाऊन त्याना भांडण थांबवायला सांगतो पण कुणीच ऐकत नाही. तो नानांचे खांदे धरून त्याना सांगू पाहतो. नाना सदाशिवालाच धरतात, विश्राम व नानी नानाना मदत करतात आणि तिघेजण मिळून सदाशिवला दाराबाहेर ढकलतात.)

**नाना** : मला कुणी सांगायला नको आहे सौजन्याचं महत्त्व–मूर्ख लेकाचा—विश्राम—(विश्राम आईशी वाद घालतो आहे) अरे ऐका ऐका माझं—

**विश्राम**:—ऐकणार नाही—मी कुणाचंच ऐकणार नाही—

**नानी** : नकोच ऐकूस तू—मंदे मंदे माझं ऐक जरा—

**विश्राम** : कुणाचंच ऐकू नकोस मंदे— (पुन्हा एकदा सर्वांना भांडणाची उबळ येते. एकमेकाशी दात ओठ खाऊन बोलतात. ऐकणाऱ्याला काहीही कळत नाही—नुसता गोंधळ वाढत जातो आणि पडदा पडतो.)

●●●

(एकांकिकेच्या प्रयोगाचे हक्क सौ. प्रतिभा सबनीस, ८/८७ रामकृष्ण नगर, खार यांचेकडे आहेत. त्यांची लेखी परवानगी घेतल्याशिवाय व प्रयोगमूल्य म्हणून रु. १५ दिल्याशिवाय कुणालाहि प्रयोग करता येणार नाही.)




